# पुरस्कार

मुंबई विद्यापीठात बौद्धांच्या पालीभाषेच्या अध्ययन अध्यापनाला सुरुवात होऊन सुमारें २० वर्षे होऊन गेलीं. एवढ्या काळात अनेक अडचणींतून वाट काढीत ह्या भाषेनें मुंबई विद्यापीठाच्या निरनिराळ्या परीक्षांकरिता नेमलेल्या, दुय्यम म्हणून गणलेल्या, अभिजात वाङ्मयाच्या प्राचीन भाषामधील आपलें स्थान टिकविलें आहे एवढेंच नव्हे, तर जनांचे धर्मग्रंथ अर्धमागधी वगैरेसारख्या ज्या प्राचीन प्राकृत भाषांमधून ग्रथित केलेले आहेत त्या भाषांच्या अभ्यासालाहि विद्यापीठात स्थान मिळवून देण्याला कारणीभूत झाली आहे. आद्य बौद्धधर्माचें यथार्थ ज्ञान करून देणारें, उपलब्ध असलेलें, सर्वात प्राचीन वाङ्मय जर कोठे असेल तर तें पाली-भाषेतच आढळतें, तेव्हा बौद्धधर्माचा संपूर्णपण अभ्यास करूं इच्छिणाऱ्यास ह्या भाषेच्या अभ्यासाची जरूरी आहे एवढेंच नव्हे, तर बौद्धधर्माचा हिंदुस्थानांतील जनतेवर काय परिणाम झाला व त्यामुळें सबंध हिंदी धार्मिक कल्पनावर व संस्कृतीवर कोणते परिणाम झाले हें जाणणाऱ्यासहि पालीभाषेच्या ज्ञानाची आवश्यकता आहे. तसेंच समाजशास्त्राच्या अभ्यासकास व हिंदुस्थानात हल्लीं प्रचलित असलेल्या आर्यभाषाच्या अभ्यासकांनाहि ह्या भाषेचें महत्त्व विसरून चालणार नाहीं.

*वैदिक भाषेला सर्वांत जवळ असलेली अशी कोणची प्राकृतभाषा असेल तर ती पालीभाषा होय. आर्य व अनार्य ह्यांच्या परस्पर संघट्टनामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितींत आर्यांच्या वैदिकभाषेला इ० स० पूर्वीच्या सातव्या शतकाच्या सुमारास जें प्रथम अपभ्रष्ट स्वरूप प्राप्त झालें तें स्वरूप, किंवा त्याच्याशीं अत्यंत सलग्न असलेलें असें स्वरूप, जर कोठें आढळत असेल तर तें हल्लीं 'पाली' ह्या नावानें ओळखल्या जाणाऱ्या भाषेमध्येंच आढळतें. 'पाली' हें नांवहि फार*

प्रकाशक
ना. वा. तुगार,
४०८ नारायण पेठ,
मुजावराचा बोळ, पुणें २

[ सर्व हक्क लेखकाचे स्वाधीन ]

पुस्तकें मिळण्याचा पत्ता —
लेखक अगर पूना ओरिएंटल बुक एजन्सी,
१५ शुक्रवार, पुणें व इतर प्रसिद्ध बुकसेलर्स याचेकडे

मुद्रक
स. रा. सरदेसाई, बी. ए., एल्‌एल्‌. बी.,
नवीन समर्थ विद्यालयाचा 'समर्थ भारत' छापखाना,
४१ बुधवार, पुणें २

# पुरस्कार

मुंबई विद्यापीठात बौद्धांच्या पालीभाषेच्या अध्ययन अध्यापनाला सुरुवात होऊन सुमारें २५ वर्षे होऊन गेलीं. एवढ्या काळात अनेक अडचणींतून वाट काढीत ह्या भाषेनें मुंबई विद्यापीठाच्या निरनिराळ्या परीक्षांकरितां नेमलेल्या, दुय्यम म्हणून गणलेल्या, अभिजात वाङ्मयाच्या प्राचीन भाषामधील आपलें स्थान टिकविलें आहे. एवढेंच नव्हे, तर जनांचे धर्मग्रंथ अर्धमागधी वगैरेसारख्या ज्या प्राचीन प्राकृत भाषांमधून ग्रथित केलेले आहेत त्या भाषांच्या अभ्यासालाहि विद्यापीठात स्थान मिळवून देण्याला कारणीभूत झाली आहे. आद्य बौद्धधर्माचें यथार्थ ज्ञान करून देणारें, उपलब्ध असलेलें, सर्वांत प्राचीन वाङ्मय जर कोठें असेल तर तें पाली-भाषेंतच आढळतें. तेव्हां बौद्धधर्माचा संपूर्णपणे अभ्यास करूं इच्छिणाऱ्यास ह्या भाषेच्या अभ्यासाची जरूरी आहे. एवढेंच नव्हे, तर बौद्धधर्माचा हिंदुस्थानातील जनतेवर काय परिणाम झाला व त्यामुळें समग्र हिंदी धार्मिक कल्पनांवर व संस्कृतीवर कोणते परिणाम झाले हें जाणणाऱ्यासहि पालीभाषेच्या ज्ञानाची आवश्यकता आहे. तसेंच समाजशास्त्राच्या अभ्यासकांस व हिंदुस्थानात हल्लीं प्रचलित असलेल्या आर्यभाषांच्या अभ्यासकांनाहि ह्या भाषेचें महत्त्व विसरून चालणार नाहीं.

वैदिक भाषेला सर्वांत जवळ असलेली अशी कोणची प्राकृतभाषा असेल तर ती पालीभाषा होय. आर्य व अनार्य ह्यांच्या परस्पर संघट्टनामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितींत आर्यांच्या वैदिकभाषेला इ० स० पूर्वीच्या सातव्या शतकाच्या सुमारास जें प्रथम अपभ्रष्ट स्वरूप प्राप्त झालें तें स्वरूप, किंवा त्याच्याशीं अत्यंत संलग्न असलेलें असें स्वरूप, जर कोठें आढळत असेल तर तें हल्लीं 'पाली' ह्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या भाषेमध्येंच आढळतें. 'पाली' हें नावहि फार

प्राचीन नाहीं इ. स. ५ व्या शतकात होऊन गेलेल्या बुद्धघोष नावाचा एक सुप्रसिद्ध विद्वान् भाष्यकार ह्या भाषेस ' मागधी[१] ' असें म्हणतो.

' पाली ' ह्या शब्दाचा मूळ अर्थ पंक्ति ( ओळ ), नंतर क्रमाक्रमानें धर्मग्रंथातील ओळ किंवा उतारा, धर्मग्रंथ, धर्मग्रंथाची भाषा, असा अर्थ बदलत गेला असें दिसतें.

पालीभाषेच्या अभ्यासक्रमाला आधुनिक पद्धतीनें लिहिलेल्या छोट्याशा, सुटसुटीत, पण व्यवहारोपयोगी, अशा व्याकरणाची अत्यंत गरज भासत असे. पालीभाषा अध्यापक चिं. वि. जोशी, एम्. ए., बडोदा कॉलेज, ह्यांचें Manual of Pali हें पुस्तक बरेंचसें उपयोगी पडत असे. पण अलीकडे मुंबई विद्यापीठानें मॅट्रिकच्या परीक्षेंत पालीभाषेंतील प्रश्न पत्रिकांचीं उत्तरें प्रचलित प्रांतिक भाषांतूनहि देण्याची सवलत ठेवल्यानें साहजिकच मराठींतून उत्तरें लिहिणाऱ्या विद्यार्थ्यांस उपयुक्त होईल अशा एखाद्या प्राथमिक स्वरूपाच्या ' पालीभाषा प्रवेश ' यासारख्या पुस्तकाची उणीव भासू लागली होती. आनंदाची गोष्ट आहे कीं ही उणीव लवकरच श्री. ना. वा. तुगार, काव्यतीर्थ, पालीतीर्थ, संस्कृत व पाली भाषांचे शिक्षक, न्यू इं. स्कूल, पुणें, ह्यांनीं भरून काढली. श्री. तुगार ह्यांनीं गेलीं ६ वर्षें ह्या भाषेचें अध्यापन केलेलें आहे, त्यामुळें आलेल्या अनुभवाचा फायदा घेऊन व हें पुस्तक विद्यार्थ्यांस उपयुक्त कसें होईल हें ध्येय डोळ्यापुढें ठेवून ह्या पुस्तकाची रचना केली आहे. ह्या पुस्तकातील व्याकरणा संबंधींच्या मजकुराबाबतचे पाठाचे अनुक्रमाबद्दल किंचित् मतभेद होण्याचा संभव आहे. श्री. तुगार यांनीं 'प्रास्ताविक' यामध्यें लिहिल्याप्रमाणें पुस्तकात नजरचुकीनें, किंवा अशा रीतीचें पुस्तक लिहिण्याचा त्यांचा हा पहिलाच उपक्रम आहे म्हणून, जीं प्रमादस्खलितें झालीं असतील तीं वाचकवर्ग व अधिकारीवर्ग त्यांचे नजरेस आणून देईल तर ते पुढील आवृत्तींत दुरुस्त करतील.

---

१. पण ही मागधी व नंतरच्या व्याकरणकारांनीं उल्लेखिलेली ' मागधी ' यांत महदंतर आहे.

ह्या पुस्तकातील एक विशेष जो मला आवडला तो हा कीं, ह्यात निवडलेले उतारे पालीवाङ्मयातील निरनिराळ्या ग्रंथांतून घेतलेले असून त्यांपैकीं बरेचसे समर्पक व चटकदार आहेत त्यामुळे त्याच्या भाषांतराचें काम कंटाळवाणें होण्याची मुळींच भीति नाहीं. हे पुस्तक अभ्यासकांपुढें ठेवलें जात आहे. सुज्ञ वाचक योग्य तो परामर्श घेतीलच.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें
१–८–३९

पुरुषोत्तम विश्वनाथ बापट,
एम्.ए., पीएच्.डी.
पालीभाषा प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज, पुणें.

---

# पालिभाषा–प्रवेश

## अनुक्रमणिका

# शिक्षकांस सूचना

१. प्रथम शिक्षकानीं विद्यार्थ्यांस 'पालिभाषा-परिचय' व 'पालिभाषा-व्याकरण' ह्या दोन निबंधाच्या साहाय्यानें पालिभाषेची माहिती सांगावी, म्हणजे विद्यार्थी पालिभाषेच्या अभ्यासाबद्दल उत्सुक होतील.

२. नंतर विद्यार्थ्यांकडून 'पालिभाषानियम' वाचून घेऊन समजून द्यावेत.

३. प्रत्येक धड्याच्या आरंभीं 'पूर्वतयारी' या सदरात जे शब्द दिलेले असतील ते शब्द तो धडा शिकविण्यापूर्वी विद्यार्थ्यांच्याकडून तोंडपाठ करून घ्यावेत त्यासारखे धड्यातील शब्द वर्गांत चालवून घ्यावेत व दुसऱ्या दिवशीं 'गृहपाठा'चे वहींत काहीं शब्द घरून लिहून आणण्यास सांगावे. तद्वत् धातूंहि लिहून घेणें. शेवटीं धातूंचे परिशिष्ट जोडलें आहे त्याप्रमाणें प्रत्येक धातू चालवून घेणें.

४. धडा शिकल्यानंतर त्याचे संस्कार मनावर बिंबावेत म्हणून धड्याच्या शेवटीं प्रश्नसंग्रह दिला आहे. तो विद्यार्थ्यांच्याकडून सोडवून घ्यावा.

५. प्रत्येक धड्याच्या शेवटीं 'गाथा' दिल्या आहेत. त्या विद्यार्थ्यांकडून तोंडपाठ करून घ्याव्यात.

६. (अ) मराठीचीं पाली वाक्यें विद्यार्थ्यांच्याकडूनच करवून घ्यावींत. व तीं कॉम्पोशिशन ( Composition Book ) वहींत.

पठमो पाठो । दुतियो पाठो । ततियो पाठो । अशीं लिहून घ्यावींत.

(आ) कॉम्पोशिशन वहीमध्यें लिहिलेल्या वाक्यांसारखीं निराळी ५ वाक्यें विद्यार्थ्यांना गृहपाठांतल्या वहींत लिहून आणण्यास सांगावें. यामुळें मराठीचीं पालीवाक्यें बनविण्याची विद्यार्थ्यांना सवय होईल.

६. मॅन्युअल ऑफ पाली, प्रो. चि. वि. जोशी कृत (*Manual of Pali* by Prof C. V Joshi).

७. दि न्यू पालीकोर्स–ए. पी. बुद्धदत्तथेर कृत (*The New Pali Course* by A. P Buddhdattather).

८. 'पालीप्रकाश' (बंगालींत)–महामहोपाध्याय प. विधुशेखर भट्टाचार्य-कृत.

९. 'पालीप्रबोध' (हिंदींत)–पं. आद्यादत्त ठाकूर, एम. ए., काव्यतीर्थ, कृत.

वरील लेखकांनीं, इंग्रजी, बंगाली, हिंदी, जाणणाऱ्या लोकांनीं पालिभाषा शिकावी या हेतूनें जो प्रयत्न केला तो अत्यंत स्तुत्य असा आहे. मराठी भाषेव्यतिरिक्त दुसऱ्या भाषा न जाणणाऱ्या लोकांनीं पालिभाषा शिकावी या हेतूनें मीं 'पालिभाषा प्रवेश' हें पुस्तक प्रथमच मराठींतून प्रसिद्ध केलें. यानंतर लवकरच गुजराथी व हिंदी या भाषांतून हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे.

गेलीं आठ वर्षे हायस्कूलमध्यें पालि व संस्कृत या भाषांच्या अध्यापनामुळें व गेलीं दोन वर्षे हायस्कूलमधील पदवीधर ट्रेंड शिक्षकांसाठीं मोफत 'पालिभाषा-वर्ग' चालविल्यामुळें आलेला अनुभव जमेस धरून पालिवाङ्मयातील अमौलिक रत्नभांडाराची पद्धतशीर मांडणी विद्यार्थ्यांच्या पुढें ठेविल्यास त्यांचे मनात पालिभाषेच्या अध्ययनाविषयीं प्रेम उत्पन्न होईल अशा रीतीनें विषयाची मांडणी या पुस्तकांत केली असून विद्यार्थ्यांचा मार्ग सुलभ व्हावा असा या पुस्तकाचा उद्देश आहे.

प्रत्येक धड्यात ज्याच्या योगानें मनाचा विकास होऊन त्यांत मनुष्याच्या उन्नतीचीं नीतितत्त्वें, श्रद्धा, यांचें प्रतिबिंब पडेल आणि विद्या, आई-वडील, गुरु, समाज, यांच्याविषयीं आदर बाळगण्याची वृत्ति विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होईल या हेतूनें पाली वाङ्मयातील मूळ उत्कृष्ट उतारे घेतले आहेत. वाक्यें, गाथा, यांची निवड मोठ्या काळजीपूर्वक केली आहे.

पुस्तकांतील विशेष – १. पालिभाषेचें महत्त्व व आवश्यकता विद्यार्थ्यांस पटावी व त्याच्या ठिकाणीं पालिभाषेचें अध्ययन करण्याची इच्छा उत्पन्न व्हावी म्हणून ' पालिभाषा परिचय ' दिला आहे.

२. पालिभाषेचे नियम देताना शक्य तों संस्कृत, पालि, मराठी, या भाषांतील शब्दांचें परस्पर साम्य कसें आहे तें दाखवून नियम लक्षात राहील अशी माडणी केली आहे.

३. प्रथम कर्ता, कर्म, क्रियापद, याची बरोबर कल्पना यावी याकरिता पहिला व दुसरा धडा याची माडणी केली आहे. नंतर विभक्ती, गण, निरनिराळे काळ, अर्थ, याचा उपयोग चागल्या रीतीनें करता यावा म्हणून मुद्दाम प्रत्येक विभक्ति, गण, काळ, अर्थ, याचा स्वतंत्र धडा बनविला आहे. उदाहरण –तिसरा धडा घ्या. यात ३ गण, तृतीया विभक्ति व आज्ञार्थ, याची माहिती दिली आहे आणि ही माहिती विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबावी म्हणून पालीची मराठी वाक्यें व मराठीची पाली वाक्यें याची रचना केली आहे.

४. पालि वाक्यांचें मराठींत भाषांतर करताना किंवा मराठी वाक्यांचें पालींत भाषांतर करताना कंटाळा येऊ नये म्हणून शक्य तों परस्परसंबध असलेलीं वाक्यें दिलीं आहेत.

५ पाली ग्रथांपैकीं धम्मपद, दीघनिकाय, मज्झिमनिकाय, सुत्तनिपात, उदान, मिलिन्दपञ्ह, जातक, महावग्ग, पातिमोक्ख, सयुत्तनिकाय, थेरगाथा, धम्मपद अट्ठकथा, यातील प्रसग व गाथा ठिकठिकाणीं दिल्यामुळें मूर्तिमत पालिभाषेचें वातावरण उत्पन्न होऊन अध्यापक व विद्यार्थी रगून जातील अशी माडणी केली आहे.

६. व्याकरण व वाङ्मय पुस्तकांत एकत्र दिल्यानें पालीभाषेंत विद्यार्थी साहजिकच प्रविष्ट होतील

७. धडा शिकल्यावर त्याचे सस्कार मनावर कायम रहावेत म्हणून प्रत्येक धड्याचे शेवटीं प्रश्नसग्रह दिला आहे.

# आभारप्रदर्शन

( अ ) हें पुस्तक लिहिण्यापूर्वी संस्कृत व पालीभाषाच्या पुस्तकांचा मला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष उपयोग झाला. म्हणून त्या त्या पुस्तकाच्या लेखकाचा मी फार ऋणी आहें.

( आ ) ज्याच्याजवळ मीं पालिभाषेचें अध्ययन करून कलकत्तेची 'पालीतीर्थ' पदवी परीक्षा पास झालों व ज्याच्या प्रोत्साहनानें हें पुस्तक लिहू शकलों त्या वंद्य गुरुवर्य डॉ. पुरुषोत्तम विश्वनाथ बापट, एम्. ए., पीएच्. डी., पालीभाषाप्राध्यापक, फर्ग्युसन कॉलेज, पुणें, यांनी स्वतःचीं महत्त्वाचीं कामें असतांनाहि ह्या पुस्तकाचीं प्रुफें वाचून त्यात दुरुस्त्या करून मजवर फार मोठे उपकार करून ठेविले आहेत. त्याची फेड आभारानें होणार नाहीं. तथापि व्यावहारिक दृष्ट्या त्यांचे मजवरील उपकार येथें नमूद करणें हें मी माझें कर्तव्य समजतो.

( इ ) पुस्तक लिहिण्यापूर्वी मीं प्रसिद्ध पालिभाषापंडित गु. प्रो. धर्मानंद कोसंबी याच्याजवळ पालीभाषेंतील 'अभिधम्मत्थसंगह' नावाचें पुस्तक वाचलें, त्यामुळें पालि-वाङ्मय व व्याकरण याचें अध्ययन व अध्यापन कसें करावें याची कल्पना आली. त्या कल्पनेचा फायदा हें पुस्तक लिहितांना झाला याबद्दल प्रो. कोसंबी याचा मी अत्यंत ऋणी आहें.

( ई ) तद्वत् जैनाचार्य न्यायतीर्थ न्यायविजयजी याच्याजवळ अर्धमागधीचें हेमचंद्रव्याकरण व इतर अर्धमागधीचे ग्रंथ वाचीत असतांना प्राकृत भाषाचें अध्ययन व अध्यापन कसें करावें ही दृष्टि आली. त्या दृष्टीचा फायदा हें पुस्तक लिहितांना झाला त्याबद्दल गु. न्यायविजयजींचा मी अत्यंत ऋणी आहें.

( उ ) या पुस्तकाच्यापूर्वी ज्यानीं माझ्याकडून, पालीभाषेंत प्रवेश करूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांच्याकरिता सोपें असें 'वाचनपुस्तक'— 'जातकसंग्रह' व 'पालीसद्दरूपावलि' लिहून घेऊन स्वतः छापून मला वेळोवेळीं प्रोत्साहन दिलें त्या डॉ. नरहर गोपाळ सरदेसाई, व्यवस्थापक ओरिएंटल बुक एजन्सी, पुणें, याचा मी अत्यंत ऋणी आहें. तद्वत् डॉ. पी. एल्. वैद्य, एम. ए., पीएच. डी., वाडिया कालेज, पुणें,

प्रो. आर. डी. वाडेकर, डॉ. बा. वि. गोखले, पीएच्. डी., फर्ग्युसन कॉलेज, पुणें, श्री. द. प्र. खाडिलकर, काव्यतीर्थ, संस्कृतप्रधानाध्यापक न्यू इंग्लिश स्कूल, पुणें, श्री डी. टी. देशपांडे, एम्. ए., बी. टी., न्यू इ. स्कूल, पुणें. श्री. एस्. व्ही टकार, एम. ए., बी. टी., माजी सुपरिंटेंडेंट, भारत हायस्कूल, पुणें, श्री. एस्. के. एकबोटे, पुणें, यांनीं वेळोवेळीं निरनिराळ्या सूचना देऊन अमूल्य साहाय्य केलें याबद्दल त्यांचे आभार मानतों.

( ऊ ) माझे पालीभाषेचे विद्यार्थी श्री. खरोटे, बी. ए., बी. टी., संस्कृत शिक्षक, शिवाजी मराठा हायस्कूल, पुणें, श्री. जी. आर. भिडे, एस्. टी. सी. न्यू इंग्लिश स्कूल, सातारा, श्री. श्री. रा. सातपुते, संस्कृत व पालीभाषाशिक्षक, भारत हायस्कूल, पुणे श्री. म्य. अ. कदे, इंग्लिश स्कूल वर्जेत, श्री. वि. ग. निमकर, ' साहित्यप्राज्ञ, ' पुणें, एस्. टी. सी., यांनीं केलेल्या मदतीचा उल्लेख केला पाहिजे. तद्वत् माझ्या पालिभाषेच्या विद्यार्थिनी कुमारी गीता गाडगीळ, बी. ए. ( ऑनर्स ), यांनीं या पुस्तकांतील शब्दार्थसंग्रहाच्या कामाला बरीच मदत केली याबद्दल त्यांचा मी आभारी आहें.

(ऋ) या पुस्तकाच्यापूर्वी सहावीला पालीभाषेकरितां माझें 'जातकसंग्रह' या नांवाचें पुस्तक आपापल्या हायस्कुलांत लावून मला ऋणी केलें याबद्दल श्री. नी. बा. किंकर, एम्. ए., एस्. टी. सी., सुपरिंटेंडेंट, म. ए. सो. हायस्कूल, पुणें, श्री. वि. के. भागवत, बी. एजी., एस. टी. सी., असिस्टंट सुपरिंटेंडेंट, म. ए. सो. हायस्कूल, पुणें, श्री. एस्. डी. भाऊसकर, एम्. ए., बी. टी., सुपरिंटेंडेंट, पूना इंग्लिश स्कूल, पुणें, श्री. डी. एस्. जोगळेकर, बी. ए., एस्. टी. सी., सुपरिंटेंडेंट, पूना नाईट हायस्कूल, श्री. डी. ए. कुलकर्णी, बी. ए., बी. एस्सी., बी. टी., सुपरिंटेंडेंट भारत हायस्कूल पुणें, यांचे मी आभार मानतों.

( ऌ ) विशेषतः आमच्या न्यू इंग्लिश स्कूलचे सुपरिंटेंडेंट प्रो. वि. ना. कुंभारे, एम्. ए., एस्. टी. सी. डी., यांनी या पुस्तकापूर्वी माझें 'जातकसंग्रह' नांवाचें पुस्तक आमच्या शाळेत सहावीच्या पालीभाषे-

करिता नेमून तें मला शिकवण्याची संधि देऊन प्रोत्साहन दिलें त्यामुळें माझे हातून प्रस्तुतचें पालीव्याकरणाचें व वाङ्मयाचें मराठींतील पहिलें पुस्तक लिहिलें गेलें याबद्दल प्रो. कुमारे याचा मीं अत्यंत ऋणी आहें.

( ए ) श्री. स. रा. सरदेसाई, बी. ए., एल्एल्. बी., व्यवस्थापक, समर्थ भारत प्रेस, पुणें, यानीं पुस्तकाचें छापण्याचें काम सुबक व वेळेवर करून दिलें याबद्दल त्याचे आभार मानतों.

( ऐ ) या पुस्तकात चागले जे गुण असतील त्याचें सर्व श्रेय माझ्या गुरुकडे आहे. मात्र दोषाबद्दल मीच जबाबदार आहें. तरी हें पुस्तक शिकविताना येणाऱ्या अडचणी किंवा दोष मला कळविल्यास मी सुधारण्याचा अवश्यमेव प्रयत्न करीन. एवढें सागून हा 'पालिभाषा-प्रवेश' अध्ययन करणाऱ्याच्या हातीं देतो.

४०८ नारायण पेठ, पुणें.
मुजाराचा बोळ,
१५ ऑगस्ट १९३९.

नारायण वासुदेव तुंगार.

# अभिप्राय

'**Palibhasha Pravesha**' *is a manual of both Pali Grammar* and Composition, published by N V Tungar, Palitirtha, *of the New English School, Poona It is written in Marathi* and eminently serves the needs of students learning Pali through the medium of that language

The exercises in translation are well graded and vocabulary is copious The book shows the wide knowledge and *scholarship of Mr. Tungar*

Sd/–R G **Bhadkamkar**, M A
Professor of Sanskrit,
*Ismail College, Jogeshwari.*
Author of Pāli-pāth malā

*20th July 1939*

---

Dear Mr. Tungar,

I have gone through the pages of your book and I am glad to assert that your attempt to write a guide to Pali Translation and Grammar through the medium of Marathi has proved a complete success The standard to be expected from students of your book will naturally be high Especially your exercises for translation are very happy and I have no hesitation in recommending the book to the Teachers and pupils who have to work with Marathi as medium The grammar portion is based on the assumption that Pali writers are top *sticklers to rules of declension and conjugation*, but they take too much liberty with rules of grammar All the same grammarians must be exact and accurate

Sd/–**C V Joshi**, M A
Prof of Pali, Baroda College, Baroda
Author Manual of Pāli

12–7–39

---

I have read a portion of the 'Palibhasha Pravesh' by Mr N V Tungar, the Pali teacher, Poona, and been much impressed with the useful purpose the book is likely to serve There was a great want of such a book as it is written in an easy style and is free from dullness

I congratulate him on his ability in the acquisition of such an excellent publication

I have nothing but admiration for his production, which, I feel assured will find a wide circulation amongst the Pali students

Sd/-S K Deshpande, S T C
Pali Teacher
The M C High School Baroda

14 th July 1939

---

## श्री वेङ्कटेश प्रसन्न

रा रा नारायण वासुदेव तुंगार, काव्यतीर्थ व पालितीर्थ, यांचें 'पालिभाषा प्रवेश' हे पुस्तक वाचून पाहिलें या पुस्तकात सोपपत्तिक पालीभाषेचें व्याकरण, पाली शब्दसंग्रह व वाक्यसंग्रह यांची निवड व योजना पालीभाषेत प्रवेश करूं इच्छिणाऱ्यास उपयुक्त होईल अशी केली आहे या पुस्तकाशीं दृढपरिचय झाला असता पालीभाषेंत प्रवेश व प्रगति होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं हें पुस्तक मराठींत केलें असल्यामुळें महाराष्ट्रांतील आबालवृद्धांना तें उपयुक्त असें झालें आहे

इसवी सनापूर्वी पांचशें वर्षांपासून इसवी सनानंतर पांचशें वर्षांपर्यंत बौद्धवाङ्मयाचा प्रचार भरतखंडात फारच होता बुद्धाच्या कथा व धर्मोपदेश, अश्वघोषासारखे अभिजात कवी, दिङ्नागासारखे दिग्गज विश्रुत पंडित, अशोकासारखे सम्राट् नृपति याच काळांत झाले त्यामुळें या काळास धार्मिक, शास्त्रीय व राजकीय दृष्ट्या विशेष महत्त्व आलें या कारणास्तव अर्वाचीन विद्वान या काळाचा धार्मिक, शास्त्रीय व लौकिक इतिहास जाणण्याविषयीं विविध प्रयत्न करीत आहेत हे त्यांचे प्रयत्न सफल होण्यास

पालीभाषेचें ज्ञान असणें हें विशेष महत्त्वाचें कारण आहे. अशा वेळीं रा. तुगार यांनीं ' पालिभाषा प्रवेश ' हें उपयुक्त पुस्तक प्रसिद्ध करून त्यांनीं पालीभाषाजिज्ञासूंवर विशेष उपकार केले आहेत. याबद्दल तज्ज्ञ लोक त्यांचे आभार मानतील. रा. तुगार यांजकडून पालीभाषेसंबंधानें अशीच सेवा घडून सर्व पालीवाङ्मय सुलभ होवो, असें आम्ही मनापासून इच्छितों.

रंगाचार्य बाळकृष्णाचार्य रड्डी, 'विद्याभूषण'
२३।७।१९३९ 'रिटायर्ड शास्त्री', डेक्कन कॉलेज, पुणें.

---

*काव्यतीर्थ व पालीतीर्थ ना. बा. तुगार यानीं ' पालिभाषा-प्रवेश ' हें पुस्तक लिहून महाराष्ट्रातील पालीभाषा व वाङ्मय याच्या अध्ययनास मोठी चालना दिली आहे.* आजपर्यंत मराठींत व्यवस्थित व शास्त्रीय *रीतीनें पालि व्याकरण नसल्यामुळें पालीभाषा शिकणाराची मोठी कुचंबणा झालेली होती. श्री तुगार याना संस्कृत व पाली या दोन्ही भाषांचें* उत्तम ज्ञान असल्यामुळें व त्यानीं या पुस्तकात तौलनिक दृष्टि सर्वत्र ठेविली असल्यामुळें या पुस्तकाचें महत्त्व फारच वाढलेलें आहे. पुस्तकाची रचना व *मांडणी फारच चांगल्या रीतीनें केलेली आहे. त्यात व्याकरण व पालीप्रबंध* (Composition) एकत्र असल्यामुळें विद्यार्थ्यांची सोय झाली आहे पुस्तकांतील उदाहरणें तिपिटकांतून घेतलीं असल्यामुळें अनायासेंच पाली-भाषा व वाङ्मय सहजगत्या विद्यार्थ्यांस सुपोद्गत होण्याला मदत होते. *पाठाचे शेवटीं प्रश्नसंग्रह दिलेले आहेत. श्री. तुगार यांचा हा उपक्रम अत्यंत* अभिनंदनीय होय व ह्यांच्या ह्या कार्यात मी त्याना उत्तरोत्तर भव्य यश चिंतितों. याच्या पुस्तकानें पालीभाषेचा अभ्यास यामध्या दुय्यम शाळांतून जोरानें झाल्याशिवाय राहणार नाहीं.

ना. के. भागवत, एम्. ए.,
ता. २२।७।३९ पालीभाषा-अध्यापक, सेंट झेविअर कॉलेज, मुंबई.
फेलो मुंबई युनिव्हर्सिटी व ऑनररी संपादक-देवनागरी लिपी,
*पाली ग्रंथमाला-मुंबई युनिव्हर्सिटी.*

सर्वदर्शनसंग्रह व इतर संस्कृतग्रंथातून बौद्धांच्या तत्त्वज्ञानासंबंधीं नेहमीं उल्लेख येतात. त्याची बरोबर कल्पना यावी म्हणून बौद्धांचे मूळचे पाली-तील ग्रंथांचें अध्ययन करणेंच आवश्यक आहे. यापूर्वी 'पालिभाषा-प्रवेश' यासारखें मराठींतून पुस्तक नव्हतें. म्हणून जुन्या पद्धतीनें संस्कृत शिकणाऱ्याना पालीभाषेचें अध्ययन करता आलें नाही. यापुढें रा. तुगार यांच्या या पुस्तकामुळें जुन्या पद्धतीचें शास्त्री लोक व नव्या पद्धतीचे लोक पालिभाषेचें जरूर अध्ययन करतील.

नारायणशास्त्री अनंत वाडीकर
ता. २५।७।१९३९ 'न्यायरत्न', अहमदाबाद.

पालीभाषेच्या वाढत्या प्रसाराकडे लक्ष दिल्यास असें दिसून येईल कीं, विद्यार्थिवर्गाचा पालीभाषेकडे बराच ओढा आहे व गेल्या दोनचार वर्षांत प्रवेश परीक्षेला पालि विषय घेऊन बसणाऱ्या मुलांच्या वाढत्या संख्ये-कडे पाहिलें तर असें दिसून येईल कीं, किती तरी विद्यार्थी पालीभाषेचा मराठींतून अभ्यास करीत आहेत. परंतु त्याना मार्गदर्शक असें पालीभाषेचें व्याकरण मराठींत नव्हतें. ती उणीव श्री. तुगार यांच्या 'पालिभाषा-प्रवेशा'ने भरून काढिली आहे. श्री. तुगार हें पालिभाषा-शिक्षकाचें काम बरेच दिवस करीत असल्याने विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें पुस्तक जास्त उप-युक्त ठरेल. 'पालिभाषा-परिचय' हें प्रकरण देखील पाली-अध्ययनाच्या उप-युक्ततेच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. ह्या पुस्तकानें पालीभाषा-अध्यापनाचा मार्ग सुगम झाला आहे.

ज. कृ. काटे, बी. ए.,
ता. २४।७।१९३९ 'पाली-शिक्षक', बडोदें हायस्कूल, बडोदें.

---

श्री. तुगार हे संस्कृत व पाली वाङ्मयाचे उत्तम विद्वान् आहेत. ते गेलीं आठ वर्षें हायस्कुलात पाली व संस्कृत या भाषांच्या अध्यापनाचें कार्य करीत आहेत. याशिवाय त्यांनीं गेलीं दोन वर्षें 'शिक्षकांकरिता मोफत पालिभाषा-वर्ग' चालून हायस्कुलांतील पचवीस पदवीधर ट्रेंड शिक्षकांना पालिभाषा शिकविली. श्री. तुगारांच्या या अध्यापनाचें फल म्हणजे मराठींतील पहिलें 'पालिभाषा प्रवेश' हें पुस्तक होय. यांत विद्यार्थ्यांना पालीभाषेचें अध्ययन चित्ताकर्षक, आनंदानें, शंकारहित करिता येईल या दृष्टीनें *व्याकरणाची व वाङ्मयाची, मांडणी केली आहे.* इतर भाषेप्रमाणें पाली भाषेच्या अध्ययनाची काय जरुरी आहे, ते 'पालिभाषा परिचय' या प्रकरणांत स्पष्ट दाखविलें आहे. या पुस्तकाचे द्वारें सर्वांना पालीभाषेचा अभ्यास करण्याचा मार्ग सुगम होईल यांत शंका नाहीं. हायस्कुलांत हें पुस्तक चालू होण्याची शिफारस करण्यांत आम्हाला आनंद वाटतो.

सदाशिव मोरेश्वर फडके, बी. ए., एस. टी. सी.,
पालिभाषा शिक्षक, म. ए. सो. हायस्कूल, पुणें.

सदाशिव बळवंत भागवत, बी. ए., एल्‌एल्. बी.,
ता. २४।७।३९ 'पालिभाषा शिक्षक', पूना नाइट हायस्कूल, पुणें.

पुरुषोत्तम यशवंत जोशी, *बी. ए. (ऑनर्स)*,
'पालिभाषा-शिक्षक', पूना इंग्लिश स्कूल (सरस्वती मंदिर), पुणें.

---

श्रीशिव. शरणम्

*श्रीयुत पालीतीर्थ व काव्यतीर्थ नारायण वासुदेव तुगार* हे पालीभाषेचे तज्ज्ञ असून त्यांनीं 'पालिभाषा प्रवेश' लिहून मराठींत एका उपयुक्त पुस्तकाची भर घातली आहे, याबद्दल ते निःसंशय धन्यवादार्ह आहेत. मुंबई विश्वविद्यालयानें इ. स. १९१० पासून प्रवेशपरीक्षा व पुढील परीक्षा यांसाठीं घ्यावयाच्या ऐच्छिक भाषाविषयामध्यें पालीभाषेचा

समावेश केला आहे. तेव्हा पालीभाषेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस मराठींतून पालीभाषेच्या व्याकरणाचें ज्ञान करून देणाऱ्या एखाद्या पुस्तकाची उणीव भासत होती ती या 'प्रवेशानें' दूर होईल. यातील व्याकरणविषय तुलनात्मक पद्धतीनें सांगितला आहे. व्याकरणाच्या नियमाबरोबरच त्या नियमांना आधारभूत असलेलीं कच्चायन ( कात्यायन ) व्याकरणाचीं सूत्रेंहि ठिकठिकाणीं दिलीं असल्यामुळें या पुस्तकाचा दर्जा वाढला आहे.

पालीचें ज्ञान अनेक दृष्टींनीं कसें आवश्यक आहे, याचें श्री. तुगार यांनीं 'पालिभाषा-परिचय' या निबंधांत विवेचन केलेंच आहे. तेव्हा स्वतंत्र अभ्यासकासहि हें पुस्तक उपयुक्त होईल.

पालीभाषेच्या अभ्यासकास आवश्यक असा पाली-मराठी कोश तयार करण्याचा श्रीयुत तुगार यांचा विचार असून त्या दृष्टीनें त्यांचे प्रयत्नहि चालू आहेत. तुगारांचा हा उपक्रम खरोखर अतिशय प्रशंसनीय असून याहि कार्यांत त्यांना पूर्ण यश येवो, अशी ईश्वरचरणीं प्रार्थना करितों.

श्रा. व. १ १८६१ भौमवार (ता. १-८-१९३९)

पुरुषोत्तमशास्त्री रानडे,
आनंदाश्रम. पुणें.

---

पण्डित ना. वा. तुगार, काव्यतीर्थ, पालीतीर्थ, यांच्या 'पालिभाषा-प्रवेश' या पुस्तकाचीं मुद्रितें वाचून पाहिलीं. पुस्तकाची रचना चांगली असल्यामुळें तें अभ्यासकांना चांगलें उपयुक्त होईल यांत संशय नाहीं. अनेक दृष्टींनीं जिचा अभ्यास करणें आवश्यक आहे अशा पालीभाषेचें अध्ययन करण्याकडे नवे व जुने संस्कृत पण्डित वळले नाहींत त्याचीं पुढील कारणें आहेत.

१. पालीचीं देवनागरी लिपींत पुस्तकें नसणें. २. त्या त्या प्रांतातल्या भाषांतून पालीचें शास्त्रशुद्ध असें व्याकरणाचें प्राथमिक पुस्तक नसणें. ३. पालीकोश नसणें. (मि. ऱ्हिस् डेव्हिड व मि. विल्यमस्टेड या युरोपीयन पालीभाषापण्डितांची ७५ रु. किंमतीची 'पाली-इंग्लिश डिक्शनरी' आहे.)

परंतु गेल्या पांच वर्षांपासून मुंबई युनिव्हर्सिटीनें इंग्लिश, सयामी, ब्रम्ही, या लिप्यांतून असलेलीं पालीभाषेचीं पुस्तकें पालीभाषापंडिताकडून

देवनागरी लिपींत छापण्याचा अभिनव व स्तुत्य असा उपक्रम सुरू केला आहे. तद्वत् श्री. तुंगार यांनी 'पालिभाषा-प्रवेश' हें पुस्तक प्रथमच मराठींतून प्रसिद्ध केल्यामुळें मराठींतून शिकणाऱ्या पालीभाषाजिज्ञासूंना ऋणी केलें आहे. तद्वत्, श्री. तुंगार हे लवकरच गुजराथी, हिंदी, वगैरे मातृभाषा असलेल्या पालीभाषाजिज्ञासूंना ऋणी करतील अशी आशा आहे.

लक्ष्मणशास्त्री मोरेश्वर मुर्गुडकर
'व्याकरणरत्न'
प्रधान संस्कृताध्यापक,
संस्कृत पाठशाळा, संस्थान इचलकरंजी.

६ जुलै १९३९

---

श्रीयुत रा. रा. तुंगार, पालीतीर्थ व काव्यतीर्थ, यानीं 'पालिभाषा-प्रवेश' हें पुस्तक लिहून त्याना इंग्रजी येत नाहीं अशा पालीभाषाजिज्ञासूंवर फार उपकार केले आहेत. वस्तुत: संस्कृत भाषेच्या अध्ययनाबरोबरच पाली, अर्धमागधी, वगैरे भाषांचें आपल्याकडील प्राचीन परंपरेतील लोकांनीं अध्ययन करावयास पाहिजे होतें. परंतु तें न झाल्यामुळें पाली, वगैरे प्राकृत भाषा जिज्ञासूंना इंग्रजी वगैरे परदेशी भाषांच्या द्वारा या भाषांचें ज्ञान संपादावें लागत असे. ही अत्यंत लाजिरवाणी स्थिति होती. ती या पुस्तकानें दूर होईल. त्याचप्रमाणें श्री. तुंगार यांना अशी विनंति आहे कीं, त्यानीं यानंतर पाली-मराठी कोश तयार करून या भाषेच्या पूर्ण अध्ययनाची सोय करावी. कारण व्याकरण व कोश हीं भाषेच्या अध्ययनाचीं दोन मोटीं साधनें आहेत.

पांडुरंग विठ्ठल देव,
संस्कृत व हिंदी शिक्षक,
महिलाश्रम हायस्कूल, हिंगणें बुद्रुक, पुणें.

३-८-१९३९

---

श्री. तुगार यांनीं रचिलेलें 'पालिभाषा-प्रवेश' हें पुस्तक माझ्या मतें पालीभाषेच्या अध्ययनास अत्यंत उपकारक होईल यांत शंका नाहीं. श्री. तुगार यांनीं हे पुस्तक मराठींत लिहिल्यानें अनेक महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांचें लक्ष या भाषेच्या अभ्यासाकडे लागेल आणि हें पुस्तक त्यांच्या अध्ययनास साहाय्यक होईल. अध्यापकांसहि याचा उपयोग होईल हें उघड आहे.

या पुस्तकाची रचना श्री. तुगार यांनीं विचारपूर्वक केली आहे असें दिसून येईल. भाषेचें अध्ययन करतां करतां बुद्ध व त्याचें तत्त्वज्ञान याची माहिती विद्यार्थ्यांस सहजासहजीं होईल असा प्रयत्न कर्त्यानें केला आहे तो खचित अभिनंदनीय आहे, असे कथनीय विशेष कर्त्याच्या परिश्रमाची व चातुर्याची साक्ष देत आहेत.

आपल्या भाषिक शिक्षणाची मांडणी जितक्या त्वरेनें बदलेल तितकें उत्तम. निरनिराळ्या भाषांचें अध्ययन त्या त्या भाषेचा जीवनाशीं संबंध लक्षांत घेऊनच ठरविलें पाहिजे. कृत्रिमता येथें नको! भलत्याच परंपरेचा बाऊहि नको. आपली मातृभाषा आपल्या जीवनाचा मुख्य आधार होय. म्हणून तिची काळजी प्रथम घेतली पाहिजे. व तिची जागाहि पहिलीच पाहिजे मग हिंदुस्थानी, इंग्रजी, यांचें जसें प्रयोजन तसें अध्ययन आवश्यक केलें पाहिजे. याशिवाय आणखी एखादी चालू देशी भाषा आली तरी उत्तम जपानी, चिनी वगैरे पौर्वात्य भाषांचें अध्ययन आपल्या इकडे अवश्य झालें पाहिजे युरोपांत रशियन भाषेचें महत्त्व सांप्रत वाढत आहे म्हणून तीहि भाषा येथें शिकविली पाहिजे. प्राचीन भाषांत नुसतें संस्कृतच तेवढें ठेवून कार्यभाग होणार नाहीं. प्राकृत भाषांचें अध्ययन अवश्य व्हावयास पाहिजे. याप्रमाणें निरनिराळ्या भाषा शाळांतून व संस्कृत पाठशाळांतून पाली वगैरे प्राकृत भाषा शिकल्या व शिकविल्या गेल्या पाहिजेत.

ध्वनिमुद्रिकांच्या साहाय्यानें सर्वभारतीय देशी भाषा विद्यार्थ्यांच्या कानावरून तरी जातील अशी व्यवस्था व्हावयास पाहिजे. यामुळें परकीयपणाची भावना सुसह्य व सहकारी रूप धारण करील. पाली वगैरे प्राकृत भाषांचा व विद्यमान देशी भाषांचा संबंध फार निकट

आहे. ( फारसी भाषेचाहि सरध काहीं थोडा थाडका नाहीं. ) यापुढील पिढींत निरनिराळ्या भाषा जाणणारे असे निदान दाकडा चारदोन चारदोन तरी विद्यार्थी सर्व प्रांतातून आढळले पाहिजेत. यासाठीं खर्च पडेल, पण तो अनाठायीं खास जाणार नाहीं. इतर देशाच्या अपेक्षेनें हिंदुस्थानची ( पसतीस कोटी जनाची ) अवस्था व गरज निराळी आहे, म्हणून आपलें भाषाविषयक धोरण आमूलाग्र बदललें पाहिजे. खोटे अभिमान टाकले पाहिजेत. पुष्कळदां शिक्षक भलताच संकुचित दुराग्रह दर्शवितात. त्यामुळें विद्यार्थ्यांस निरनिराळ्या भाषा शिकण्यास प्रोत्साहन देण्याऐवजी ते परावृत्तच करतात. तो काळ बदलत आहे. आणखी बदलला पाहिजे या बदलत्या काळाचें एक शुभ चिन्ह म्हणून श्री. तुगार मास्तर याच्या प्रयत्नाचें मी स्वागत करतों.

दत्तो वामन पोतदार,
ता. १-८-१९३९ सेवानिवृत्त प्रोफेसर,
सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें,
सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक

---

# पालिभाषा-परिचय

पालीभाषा ही अमूल्य अशा प्राचीन वाङ्मयाची एक मोठी खाणच आहे म्हणून या भाषेचा अभ्यास (१) भाषाविज्ञान, (२) इतिहाससंशोधन, (३) बौद्धधर्म, (४) बौद्धतत्त्वज्ञान, वगैरे निरनिराळ्या दृष्टींनीं सर्व जगास हितावह आहे म्हणूनच पाली वाङ्मय सुधारलेल्या देशास आश्चर्यकारक वाटल्यामुळें युरोपातील अमेरिका वगैरे देशातील नामांकित युनिव्हर्सिट्यांतून पाली भाषेचा अभ्यास मोठ्या आस्थापूर्वक केला जातो. सिंहल, ब्रह्मदेश, सयाम, कांबोज, तिबेट, चीन, जपान, या ठिकाणच्या लोकांनीं पाली वाङ्मयाचें अध्ययन, अध्यापन, संशोधन, मोठ्या भक्तीनें सुरू केलें.

असें आहे तर महत्त्वपूर्ण अशा पाली भाषेच्या अध्ययन, अध्यापन, संशोधन, वगैरे बाबतींत हिंदुस्थानातील लोकांची उत्सुकता वाढावी हें अगदीं स्वाभाविकच आहे.

**(१) भाषाविज्ञान** —आपल्या अंतःकरणातील अभिप्राय दुसऱ्या माणसाला समजून देण्याकरिता उच्चारला जाणारा जो ध्वनि त्याला भाषा असें म्हणतात. भाष्–बोलणें या धातूपासून ‘ भाषा ’ हा शब्द बनला. जर ही भाषा नसती तर माणसाला आपल्या अंतःकरणातील विचार प्रकट करता आले नसते. माणसाप्रमाणें पशुपक्ष्यादिकांचीहि भाषा आहे.

हल्लीं मराठीचे १ पुणेरी, २ कोंकणी, ३ चित्पावनी, ४ वऱ्हाडी, ५ नागपुरी, ६ खानदेशी, ७ कारवारी वगैरे जसे प्रकार आहेत. तसेच पूर्वी प्राकृत भाषेचे –१ महाराष्ट्री, २ शौरसेनी, ३ प्राची, ४ अवंती, ५ मागधी (पाली व अर्धमागधी), ६ शाकारी, ७ चांडाली, ८ शाबरी, ९ आभीरिका, १० टाकी, ११ नागर, १२ व्राचड, १३ उपनागर, १४ कैकेयी, १५ पैशाची, १६ पांचाली, असे सोळा प्रकार होते. मागधी भाषेंत बौद्धधर्माचे सर्व ग्रंथ लिहिलेले आहेत. मागधी भाषेस बुद्धघोषाचार्यानंतर पांचव्या शतकांत ‘ पाली ’ हें नांव रूढ झालें आहे.

(पाली, पालि, असा ऱ्हस्व व दीर्घ शब्द आहे.) या भाषेचा काळ इसवी सनापूर्वी तिसरें शतक होय.

संस्कृत भाषा व हल्लींच्या देशी भाषा याना जोडणाऱ्या दुव्यापेकीं एक दुवा पाली भाषा आहे, जसें:—

| | संस्कृत | पाली | मराठी | हिंदी |
|---|---|---|---|---|
| ( १ ) | चक्र | चक्क | चाक | + |
| ( २ ) | कर्म | कम्म | काम | + |
| ( ३ ) | मृत्तिका | मत्तिका | माती | मट्टी |
| ( ४ ) | वृद्ध | वुड्ढ | + | बुड्ढा |
| ( ५ ) | कुब्ज | खुज्ज | खुजा | |
| ( ६ ) | षोडश | सोळस | सोळा | सोलह |
| ( ७ ) | पश्चात् | पच्छा | + | पीछे |
| ( ८ ) | ऊष्ण | उण्ह | ऊन्ह | |
| ( ९ ) | मस्तक | मत्थक | माथे | |
| (१०) | शिक्षा | सिक्खा | शिकणें | सिखना |
| (११) | पानीय | पानीय | पानी, पाणी | |
| (१२) | नवनीत | नोनीत | लोनी, लोणी | |
| (१३) | शश | सस | ससा | |
| (१४) | केश | केस | केस | |

(१) त्या वाटेनें काटे फार आहेत, (२) हातास फोड आला आहे, (३) डोक्याला जखम झाली इत्यादि उदाहरणात वाटेनें, हातास, डोक्याला, हीं सर्व अधिकरणें आहेत, तेव्हां अधिकरणार्थी सप्तमी मानली, तर या सर्व रूपांचा उलगडा कसा होणार अशी शंका येते, त्याचें उत्तर मराठी व्याकरणांत समाधानकारक सांपडत नाहीं. ' त्या वाटेनें काटे फार आहेत ' या उदाहरणांत ' वाटेनें ' या तृतीयेचा अर्थ ' वाटेंत ' असा अधिकरणार्थी ( सप्तमी ) केल्याशिवाय वाक्याचा बोध होत नाहीं. मराठींत सप्तमीच्या अर्थी तृतीया जी वापरतात त्याला पालीभाषेच्या व्याकरणाचा पुढीलप्रमाणें आधार सांपडतो, कच्चायन व्याकरणांतील ' विभच्चारा ' ( विभक्त्यर्थाः )

या प्रकरणांत 'सहम्यत्थे च' असे सूत्र आहे. त्याचा अर्थ 'सहम्यत्थे ततिया विभत्ति होती,' सप्तमीच्या अर्थी तृतीया होते. उदाहरणार्थ–तेन कालेन, (या काळीं,) तेन समयेन सप्पा होन्ति (त्या वाटेंत साप आहेत). यावरून पाली, अर्धमागधी वगैरे प्राकृत भाषांच्या व्याकरणांतील 'वाक्य-विचार' प्रकरण मराठीच्या वाक्यविचाराला पुष्कळ पोषक होईल.

(२) इतिहाससंशोधन—भगवान् गौतमबुद्धानें बौद्ध धर्माची स्थापना केली व त्याचे शिष्य आनंद, सारिपुत्त, मोग्गलान, राहुल, जीवक, वगैरेंनी आपल्या शक्तिप्रमाणें बौद्धधर्माचा प्रचार केला. तथापि सम्राट् अशोकानें आपल्या कारकीर्दींत बौद्ध धर्माला अत्यंत उत्तेजन दिलें. चोहींकडे धर्माच्या प्रचारासाठीं प्रचारकांना द्रव्याची मदत करून त्यांच्या-कडून धर्मप्रचार करविला. ठिकठिकाणीं बौद्धभिक्षूंकरितां विहार (मठ), धर्मशाळा बांधल्या. तेव्हांपासून सिंहल, ब्रह्मदेश, सयाम, कांबोज, तिबेट, जावा, चीन, जपान, या देशांतील बहुतेक लोक बुद्धधर्माचे अनुयायी बनले. म्हणून बौद्धधर्माच्या इतिहासांत तत्कालीन लोकांची बुद्धि, नीति, आचार, विचार, जीवन, राजकारण, कला, वगैरे गोष्टींचें चित्र स्पष्ट पडत असल्यामुळें गेल्या अडीच हजार वर्षांत बौद्धधर्मामुळें मानव जातीची सुधारणा कशी झाली व हिंदु धर्मीयांच्या आचारांत विचारांत बुद्धधर्माची कांहीं बाबतींत छाप कशी पडली ते बुद्धधर्माच्या इतिहासामुळें कळेल. हा इतिहास कांहीं संस्कृत व पाली ग्रंथांवरून, कांहीं शिलालेख, नाणीं, ताम्र-पट, जयस्तंभावरील लेख, लोकांचा आचार यांवरून समजतो. या सर्वांचा उल्लेख करणें येथें अशक्य आहे.

(३) बौद्धधर्म–दक्षिण आशियांत (हिंदुस्थानांत) १ हिंदुधर्म, २ जैन-धर्म (मत), ३ बौद्धधर्म (मत), ४ शीखधर्म (मत), पूर्व आशियांत (चीन जपान), ५ कानफ्यूशिअन धर्म, ६ टाओ धर्म (चीनमधील जुना धर्म), ७ शिंटोधर्म (जपानचा जुना धर्म); पश्चिम आशियांत (पॅलेस्टाइन, इराण, अरबस्थान), ८ यहुदीधर्म, ९ झोरास्ट्रिअन (पारशी) धर्म, १० इस्लाम धर्म (मुसलमानी धर्म), ११ ख्रिस्ती धर्म. इतके हल्लीं जगांत धर्म आहेत. आत्मोन्नति करून घेणें, बहुजन समाजाची उन्नति करणें हे दोन मुख्य उद्देश

सर्व धर्मांचे सारखेच आहेत. परंतु एकाच रेल्वेनें परगावीं जाणारीं माणसें जरीं त्या रेल्वे स्टेशनवर जाण्यासाठीं मोटार, बग्गी, टांगा, बैलगाडी, सायकल, इत्यादि निरनिराळीं वाहनें असतानासुद्धा आपल्या सामर्थ्या-प्रमाणें एखाद्या वाहनांतून येतात, त्याप्रमाणें या धर्मांची स्थिति आहे. माणसानीं आत्मोन्नति व समाजोन्नति करताना इतर धर्मातील लोकांना कोणत्याहि रीतीनें त्रास होता कामा नये याविषयीं अत्यंत काळजी घेतली पाहिजे.

वैदिक धर्मांचे सर्व धर्मग्रंथ वैदिक भाषेंतून व संस्कृतांतून असल्यानें व संस्कृत भाषा बहुजनसमाजाला सहज समजण्यासारखी नसल्यानें वैदिक धर्माच्या आज्ञाबद्दल सामान्य लोक अज्ञानी होते. या गोष्टीकडे त्या वेळच्या वर्णगुरु ब्राह्मणाचें जावें तसें लक्ष न गेल्यानें भगवान् महावीर व भगवान् गौतमबुद्ध यांना सामान्य लोकांना सुशिक्षित करण्याची संधि मिळाली. त्यामुळें त्याच्या हातून बहुजनसमाजोन्नतीचें कार्य घडलें.

(४) बौद्धधर्मांचीं विशेष अंगें—हें जग ईश्वरानें केव्हा निर्माण केलें, त्या ईश्वराचा साक्षात्कार कोणाला केव्हा कसा होतो, आत्मा अमर कसा आहे, वेद ईश्वरानें केले का पुरुषानें केले, ब्रह्म सत्य कीं जग मिथ्या, यज्ञ करून पुढील जन्मांत स्वर्ग मिळतो कीं मिळत नाहीं वगैरे गोष्टींविषयीं बुद्ध आपल्या बुद्धधर्मांत चर्चा न करिता समाजातील निरनिराळ्या प्रकाराच्या दुःखाच्या प्रसंगाचें चित्र पाहावयास मिळाल्यानें दुःखापासून आरंभ करून दु.खनाशाच्या मार्गाचे ज्ञान करून घेण्याच्या शेवटच्या स्थितीपर्यंत भगवान् बुद्धानें आपल्या बुद्धीचा प्रभाव दाखविला आहे.

या जगांत प्रत्येकजण कोणत्याहि कार्याकडे ( शत्रूशीं युद्ध करणें, व्यापार करणें, देणेंघेणें, घर बांधणें, परीक्षा पास होणें, वगैरे) प्रवृत्त होण्या-पूर्वी त्या कार्यांत येणाऱ्या अडचणी, दुःखाचे निरनिराळे प्रसंग, कसे टाळता येतील यासंबधींचाच प्रथम विचार करतो आणि शक्य तों तसा प्रयत्नहि करतो. ही गोष्ट भगवान बुद्धानें सांगितली.

मूळच्या बौद्धधर्मांत अंधश्रद्धेला जागा नसून मनुष्याच्या बुद्धीला प्राधान्य आहे. बुद्धानें अमुक पद्धतीनें माणसानें वागावें असें सांगितलें म्हणूनच त्यावर

विश्वास ठेवावा असें नसून मनुष्याच्या बुद्धीला बुद्धाचें सांगणें पटेल तर त्यानें तसें वागावें व त्यावर विश्वास ठेवावा

दु:खमोचन (चार आर्यसत्यें)--दु:खापासून मुक्त होणें हेंच बौद्ध-धर्माचें ध्येय आहे. चार आर्यसत्याचा पाली वाङ्मयात अनेक वेळा उल्लेख येतो.

दु:ख--दु:ख नावाचें पहिलें आर्यसत्य. जन्म, म्हातारपण, मरण, अप्रिय माणसाशी (वस्तूशीं)संबंध येणें, प्रिय माणसाशी ताटातूट होणें, ज्या वस्तूचा किंवा ज्या गोष्टीची इच्छा करावी ती न मिळणें इत्यादि दु:ख-कारक होय. थोडक्यात पंच उपादानस्कंध दु:खकारक आहे.

जन्मदु:ख जरादु:ख नित्यदु:ख पुन पुन: ।
संसारसागरे दु:ख तस्माज्जागृहि जागृहि ॥

टीका--जन्म अवघा दु:खमूळ । लागती दु:खाचे विंगळ । म्हणोनिया तात्काळ । स्वहित करावें ॥ (श्रीदासबोध शतक ३, समास ५ )

देहेंद्रियमन प्राणै: सुख दु:ख यदाप्यते ।
इम आध्यात्मिक ताप विजानीयात् हि देहिनाम् ॥

टीका--देह इंद्रियें आणि प्राण । यांचेनि योगें आपण । सुखदु:खें शिणें जाण । या नाव आध्यात्मिक ॥ खरूज, देवी, कोड, क्षय रोग, हिवताप, इसबण, दमा, लचक भरणें, वगैरे रोग होणें हें आध्यात्मिक-दु:ख होय.

सर्वभूतैर्द्वयोगात्सुख दु:ख यदाप्यते ।
द्वितीय त विजानीयात्सताप चाधिभौतिकम् ॥

टीका--सर्वभूताचेनि सयोगें । ताप होता मन भंगे । सुखदु:ख उपजों लागे । या नाव आधिभौतिक ॥ काटा मोडणें, डास, विंचू, देकूण, विंचू, साप, वगैरेंनीं चावणें, कड्यावरून पडणें, झाडावरून पडणें, हें आधिभौतिक दु:ख होय. (दासबोध शतक ७, समास ७)

शुभाशुभैः कर्मभिस्तैर्देहान्ते यमयातना ।
स्वर्नरकादिभोगस्त्विदं विद्ध्याधिदैविकम् ॥

टीका—शुभाशुभ कर्मानें जनां । देहांतीं यमयातना । स्वर्ग नरक भोग नाना । या नाव आधिदैविक ॥ चोरी केली असता शिक्षा होणें वगैरे.

दुःखसमुदाय—'दुःखसमुदय' नांवाचें दुसरें आर्यसत्य होय. तृष्णा (अतृप्ति) हीं दुःखाचीं कारण आहे.

कामतृष्णा, भवतृष्णा, विभवतृष्णा, अशी तीन प्रकारची तृष्णा आहे. चैनीच्या वस्तूंची, संपत्तीची अतृप्ति असणें, ही कामतृष्णा होय. कामतृष्णे-मुळें नेहमीं भांडणें होतात. भवतृष्णा म्हणजे जीविततृष्णा. मेल्यावर सुख मिळावें म्हणून उपवास, व्रतवैकल्यें, यज्ञ करणें, वगैरे शक्तीच्या बाहेर खर्च करून त्रास करून घेणारे लोक दिसतात. विभवतृष्णा म्हणजे विनाशतृष्णा, आत्महत्या करण्याची प्रवृत्ति.

दुःखनिरोध—'दुःखनिरोध' नांवाचें तिसरें आर्यसत्य होय. दुःखनिरोध म्हणजे दुःखाचा नाश. वरील तीन तृष्णाचा नाश केला म्हणजे दुःखनाश होईल.

दुःखनिरोधगामिनीपटिपदा—'दुःखनिरोधगामिनी पटिपदा' नांवाचें चौथें आर्यसत्य होय. दुःखनिरोधगामिनी पटिपदा म्हणजे दुःखाचा नाश करण्याचा उपाय म्हणजेच आर्यअष्टांगिक मार्ग होय.

१. सम्मादिट्ठि (सम्यक् दृष्टि)—दुःख, दुःखाचें कारण, दुःखनिरोध, दुःखनाशाचा उपाय, यांचें योग्य ज्ञान असणें यास सम्यक्दृष्टि असें म्हणतात. तद्वत् संसारांत पुष्कळ प्रसंग दुःखमय आहेत, वगैरेंचें योग्य ज्ञान असणें.

२. सम्मासंकप्प (सम्यक्संकल्प)—खालील तीन संकल्पाना सम्यक्संकल्प असें म्हणतात. नैष्कर्म्यसंकल्प—एकांतवासांत राहण्यापासून मिळणाऱ्या सुखाबद्दल प्रेम. अव्यापादसंकल्प-सर्व प्राणिमात्रावर प्रेम. अविहिंसासंकल्प—दुसऱ्याना व स्वतःला त्रास होऊ नये अशी इच्छा.

३. सम्मावाचा (सम्यक्वाचा)—खोटें न बोलणें, चहाडी न करणें, कठोर वाणी न बोलणें, व्यर्थ बडबड न करणें (वाचिक पाप न करणें).

४. सम्माकम्मन्त (सम्यक्कर्मान्त)—प्राणघात न करणें, चोरी, परस्त्रीगमन न करणें (कायिक पाप न करणें).

५. सम्माआजीव(सम्यक्आजीव)—योग्य मार्गानें उपजीविका करणें.

६. सम्मावायाम ( सम्यक्व्यायाम ):—१ मनात वाईट विचार उत्पन्न होऊ न देणें, जर वाईट विचार मनात येऊ लागले तर त्याचा नाश करणें, २ सुविचार मनात आणणें, ३ मनातील सुविचारांची वाढ करणें, या चार मानसिक प्रयत्नांना सम्यक् व्यायाम म्हणतात.

७ सम्मासति ( सम्यक् स्मृति ):— पुढील प्रकारांनीं मन जागृत ठेवणें यास सम्यक् स्मृति म्हणतात.

१ शरीर अपवित्र पदार्थांनीं बनलें ही दृष्टि असणें.

२ शरिरासंबंधीं सुखदुःखांचें अवलोकन करणें.

३ आपल्या अंतःकरणाची स्थिती पाहणें.

८. सम्मासमाधि ( सम्यक् समाधि ):—सर्व वैषयिक इच्छांचा नाश करून चार ध्यानें मिळविणें, याला सम्यक्समाधि असें म्हणतात. ( चार ध्यानांचें विस्तारभयास्तव स्पष्टीकरण केलें नाहीं. ) वरील अष्टांगिक मार्गाला मध्यम मार्ग म्हटलें आहे. विषयाच्या उपभोगानेंच सर्व कार्य होतें. 'कामेसु कामसुखल्लिकानुयोगो' हा एक मार्ग आहे, व उपास, व्रतवैकल्यें, देहदंडन 'अत्तकिलमथानुयोगो' वगैरेंनीं कार्यसिद्धि होते हा दुसरा मार्ग. पैकीं पहिला मार्ग चैनीचा आहे व दुसरा मार्ग देहदंडनाचा. यांच्या मधला मार्ग चार आर्यसत्यें होत.

वरील चार आर्यसत्यें भगवान बुद्धाच्या पूर्वीच्या योगशास्त्राच्या ग्रंथांतून दिसतात—

यथा चिकित्साशास्त्रं चतुर्विधम् । रोगो रोगहेतुरारोग्यं भैषज्यमिति । एवमेवमिदमपि शास्त्रं चतुर्विधमेव । तद्यथा संसारः संसारहेतुर्मोक्षो मोक्षोपाय इति । तत्र दुःखबहुलःसंसारो हेयः, प्रधानपुरुषयोः संयोगः हेयहेतुः-संयोगस्यात्यन्तिकी निवृत्तिर्हानम् । हानोपायः सम्यग्दर्शनम् । ( योगसूत्रभाष्य ) बुद्धानें शारीरिक रोगसंबंधाचीं चार तत्त्वें आध्यात्मिक दृष्ट्या लावून दाखविलीं.

• चित्तशुद्धि—उन्नतीला बाधक अशी जर मणसाची मनाची स्थिति असेल तर केवळ बाह्य आचाराला (दांभिक वर्तनाला) महत्त्व देणें ही मोठी

चूक आहे. हल्लीं लोक बाहेरच्या भपक्याला महत्त्व देतात, त्याचा बौद्ध धर्मांत निषेध दिसतो.

किं ते जटाहि दुम्मेध ! किं हे अजिनसाटिया ।
अब्भन्तर ते गहन बाहिर परिमज्जसि ॥

( धम्मपद, ब्राह्मणवर्ग, १२ गाथा. )

अर्थ.—हे दुष्टा, जटा वाढविल्यानें किंवा कृष्णाजिन पांघरल्यानें तुला काय फायदा आहे ? कारण तुझें अंतरंग ( मन ) घाण आहे, मग उगीच बाहेरून स्वच्छता ठेवण्यात काय अर्थ आहे ?

अहिंसा—या शब्दाचा अर्थ दुसऱ्यानें तोंडात दिली असतां दुसरा गाल पुढें करणें असा नसून, या जगात सर्व प्राणिमात्राशीं अद्वैतभाव ठेवणें, दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणें, दुसऱ्याच्या सुखानें सुखी होणें, केवळ आपल्याच सुखदुःखाकडे नेहमी न पाहता दुसऱ्याच्या सुखदुःखाची पूर्ण कल्पना असून तसें नेहमींच्या वागण्यात कोणत्याहि गोष्टीसाठीं दुसऱ्याच्या स्वार्थात विघ्न न करणें या वृत्तीला अहिंसा असें म्हणतात.

बौद्धतत्त्वज्ञान—जगात माणसाला सांसारिक गोष्टींचा विचार करणें जितकें आवश्यक आहे, त्याहूनहि पारमार्थिक गोष्टीचा विचार करणें अत्यंत आवश्यक आहे. शरिराला झालेल्या जखमा औषधानें बऱ्या करता येतात, परंतु मनुष्याच्या मनाला झालेल्या जखमा मात्र तत्त्व ज्ञानरूपी औषधाशिवाय इतर औषधांनीं बऱ्या करतां येत नाहींत म्हणून तत्त्वज्ञानाचा नेहमीं जगात उदो उदो होत असतो.

वैदिक तत्त्वज्ञानात अतिम साध्य जसा मोक्ष, तद्वत् बौद्ध तत्त्वज्ञानातें ' निर्वाण ' हें शेवटचें साध्य होय. संयुत्तनिकाय नावाच्या पुस्तकांतील जम्बुखादक संयुत्त यामध्यें जम्बुखादक नावाच्या संन्याशानें सारिपुत्राला 'निर्वाण' म्हणजे काय तें विचारलें. तेव्हां सारिपुत्रानें पुढील उत्तर दिले — यो खो आवुसो रागक्खयो, दोसक्खयो, मोहक्खयो इद वुच्चति निब्बाण

ति । लोभ, द्वेष, मोह याच्या पूर्ण नाशाला निर्वाण म्हणतात, याशिवाय अभिधम्मत्थसगह नावाच्या पुस्तकात निर्वाणाची व्याख्या आढळते—

पदमच्चुतमच्चन्त असखतमनुत्तर ।
निब्बानमिति भासन्ति वानमुत्ता महेसयो ॥

त्याच्या वासनेचा नाश झाला असे महर्षि, निर्वाण हे अढळ पद आहे त्याला अत नाहीं, तें शुद्ध व अलौकिक आहे असें म्हणतात

**उपसहार**–भगवान् बुद्धानें, चातुर्वर्ण्याच्या कडक निर्बन्धामुळें हिंदु तत्त्वज्ञानास पारखे झालेल्या अशा बहुजनसमाजास कळण्यास सोप्या अशा पाली भाषेच्या द्वार प्रथम उपदेश केला व धीर दिला तीच परपरा पुढें ज्ञानेश्वर, तुकाराम वगैरे साधुसतानी चालू ठेविल्यामुळें सस्कृत न येणारे लोक सतवाङ्मयाच्यामुळें हिंदुतत्त्वज्ञानाचा अमोलिक सदेश ऐकू शकतात

'**कृण्वन्तो विश्वमार्यम्**' या उक्तीप्रमाण बुद्धानें पाली भाषेच्या द्वारें चीन, जपान, सयाम, ब्रह्मदेश वगैरे ठिकाणीं हिंदुसस्कृतीचा प्रचार करून कोट्यावधि लोकाना आर्यसस्कृतीचे भागीदार केलें या भगवान गौतमबुद्धाच्या कार्याचें समाजानें उतराई व्हावें म्हणून पूर्वजानीं बुद्धाची दशावतारात गणना केली आणि रोजच्या पूजेच्या सकल्पात 'बौद्धावतारे, रामक्षेत्रे' असा उल्लेख केला अशा पाली भाषेचा परिचय करून घेणें हें अवश्य आहे

---

# पालिभाषा व्याकरण

१. (अ) स्वर, व्यंजन व त्यांचा उच्चारः—पालीत ८ स्वर व ३२ व्यंजनें आहेत. संस्कृतात १३ स्वर व ३३ व्यंजनें आहेत. मराठींत १३ स्वर व ३६ व्यंजनें आहे. ऋ, ॠ, ऌ, ऐ, औ, हे स्वर नाहींत. श, ष, हीं दोन व्यंजनें नाहींत. (श, ष, बद्दल 'स' होतो. जसें:—केश—केस. शश—सस. विसर्ग नाहीं.

(आ) उच्चारः—मराठींत च, ज, झ, यांचा दोन प्रकारानें उच्चार होतो. जसें:—चॅमचाभर चॅहा, चॉदण्यात चंद्र. जॅरा जीभ ताब्यात ठेव. झॅगा. (झरा) झिॅमा. पालींत चॅ, जॅ, झॅ यांचा चॅहा, जॅमि, झिॅमा, झकास याप्रमाणे अनुक्रमें उच्चार करावा.

२. लेखनपद्धतिः—गंगा, गङ्गा, पंच, पञ्च, पंडित, पण्डित, अंध, अन्ध, लिंप, लिम्प.

| संस्कृत | पाली |
|---|---|
| क्ष | क्ख ख |
| ख | ख, क्ख. |
| च | च्च |
| ठ | ट, ठ |
| ज्ञ | ञ्ज |
| ञ्च | ञ्च |

३. शब्दः—संस्कृतांत स्वरान्त व व्यंजनान्त शब्द आहेत, परंतु पालींत सर्व शब्द, स्वरान्त आहेत. जसें:—बुद्ध, अग्गि, भिक्खु, पजा, वगैरे. संस्कृतातील दण्डिन्, हस्तिन्, चन्द्रमस्, वगैरे व्यंजनान्त शब्द पालींत पुढीलप्रमाणें स्वरान्त बनतात—दण्डी, हत्थी, चन्दिमा. (व्यंजनान्त शब्दांचा उच्चार नीट करतां येत नाहीं म्हणून सर्व शब्द स्वरान्त मानले आहेत.)

( आ ) संस्कृतातून पालींत आलेल्या शब्दांचें शेकडा ७५ प्रमाण आहे.

( इ ) संस्कृतांत न आढळणाऱ्या कांहीं शब्दांचीं उदाहरणें —मातुगाम-पु० स्त्री० नथु-नाक बोन्दि-स्त्री० शरीर विजित-न० राज्य आळाहन-स्मशान

( ई ) संस्कृतमध्यें मुख्य अर्थानें अप्रसिद्ध परंतु पालींत मुख्य अर्थानें प्रसिद्ध असे शब्द —संस्कृत-विमान=आकाशयान राजवाडा पाली-विमान=राजवाडा, विमान संस्कृत उच्चार-उच्चारणें विष्ठा, गू पाली उच्चार-विष्ठा, व संस्कृत मर्कट-माकड, वानर काळी, ( किडा ) पाली-कोळी ( किडा ), माकड, वानर

४ ( अ ) लिंग – पालींत पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग अशीं तीन लिंग आहेत संस्कृतांतील मित्र शब्द पालींत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आढळतो जसें-वेदांत ' तानि धर्माणि प्रथमा यासन् ' येथें ' धर्म ' शब्द नपुंसकलिंगी दिसतो तद्वत् पालींतहि एकच शब्द दोन लिंगी असू शकतो जसें –' बहु वे सरणं यन्ति पब्बतानि वनानि च ।

( आ ) कांहीं पाली नामांना दाखविलेली व्यक्ति पुरुष किंवा स्त्री, असूनहि या नामाचें लिंग मात्र त्याहून निराळें असतें जसें –बोन्दि-शरीर ( लिंग स्त्री० ) मातुगाम-स्त्री ( लिंग-पु० )

५ शब्द –संस्कृत शब्दांच्या विभक्तींचें रूपांतर पाली शब्दांत जेथें दिसतें तेथें रूपाखालीं आडवी रेघ दिली आहे जसें –बुद्धो ( सं बुद्ध ), बुद्धा ( सं बुद्धा ), बुद्धेन ( सं बुद्धेन ), बुद्धेहि (सं बुद्धैः ), 'बुद्धेभि' हें रूप वैदिक रूपावरून आलेलें दिसतें जसें –अग्निः पूर्वेभिः ऋषिभिः । किंवा देवो देवेभिः-रागतम् ।

६ वचन –पालींत शब्द व क्रियापद यांचें एकवचन बहुवचन होतें द्विवचन होत नाहीं जसें –शब्द –बुद्धो बुद्धा प्रथमा क्रियापद –नमामि नमाम वर्तमान का० प्र पु०

७ विभक्तिसाम्य –( अ ) पालींत सात विभक्त्या आहेत प्रत्येक विभक्तींचा अर्थ संस्कृतप्रमाणें आहे तिन्ही लिंगांतल्या शब्दांत तृतीया व पंचमी

यांचें बहुवचन सारखें असते. जसें:–बुद्धेहि, बुद्धेभि. पजाहि, पजाभि, वधूहि, वधूभि. कोहि, कोभि, वगैरे. चतुर्थी व षष्ठी या विभक्ती सारख्या आहेत. जसें:–

| | | |
|---|---|---|
| अग्गिस्स, अग्गिनो | अग्गीन | च. ष. |
| दण्डिस्स, दण्डिनो | दण्डीन | च. ष. |
| पजाय | पजान | च. ष. |
| धेनुया | धेनून | च. ष. |
| कस्स, किस्स | केस, केसान | च. ष. |

टीपः— संस्कृतात विभक्तिसाम्य व रूपसाम्य असते तद्वत् पालींतही दोन्ही साम्यें असतात. जसें.—फलम् फले फलानि प्र. द्वि. रूपसाम्य. जसें:–देवाभ्याम्, तृ. च. प द्वि. व.· देवौ, प्र. द्वि. स. द्वि. व. देवेभ्यः, च.प.ब.व. देवयो· प. स. द्वि. व.

( आ ) पालींत स्त्रीलिंगी आ-कारान्त, इ ( ई )–कारान्त, उ ( ऊ )–कारान्त, शब्दाचे तृतीया ते सप्तमीपर्यंत एकवचन सारखें असतें. जसें.–पजाय, भूमिया, रत्तिया, दासिया, धेनुया.

८. ( अ ) क्रियापदपरिचयः– संस्कृतातील बहुतेक धातूंचें रूपांतर पालिवाङ्मयांत आढळते. जसें:– लच्छसि हे संस्कृतातील लप्स्यसे या क्रियापदाचें रूपांतर आहे. पालीच्या नेहमींच्या क्रियापद बनविण्याच्या नियमाप्रमाणें लभ्+इस्ससि=लभिस्ससि. ( तू मिळवशील. ' लभ ' धातूचें भविष्य का. द्वि. ए. व. ) संस्कृतात एक धातु अन्याच गणांत आढळतो. जसें:–स्तृ ५, ९ ग०. शृ. १, ४, ९. पुष् १, ४. वगैरे.

अशा प्रकार पालींत कमी आहे.

टीप.–संस्कृतवरून पालींत आलेल्या धातूंची संख्या शेकडा ८० आहे. बाकीचे धातु पालींतले आहेत.

( आ ) गणः–संस्कृतप्रमाणें पालींत धातु दहा गणांत विभागलेले आहेत. संस्कृतांत धातु दहा प्रकारात चालतो. पालींत धातु सहा प्रकारांनीं चालतो.

( इ ) काळ – १ वर्तमानकाळ. २ भूतकाळ. ३ भविष्यकाळ. संस्कृतात भूतकाळाचे तीन प्रकार आहेत. पालिंत भूतकाळाचा एक प्रकार आहे. ( काही वेळा काही धातूला ' सि, सिंसु ' असे प्रत्यय लागून भूत काळाचे दोन प्रकार होतात. )

संस्कृतात भविष्यकाळाचे दोन प्रकार आहेत. पालिंत भविष्यकाळाचा एकच प्रकार आहे.

(ई) पदः–पालिमध्यें संस्कृतप्रमाणें परस्मैपद व आत्मनेपद आहे. पण संस्कृतप्रमाणें निश्चित नसून प्रत्येक धातु परस्मैपदी व आत्मनेपदी चालतो. आत्मनेपदाचा वाङ्मयात फारसा उपयोग आढळत नाहीं.

(उ) संस्कृतात भूतकाळ व संकेतार्थ यांचीं रूपें बनवितांना धातूमागें 'अ' ( धातुस्वरादि असल्यास 'आ' व व्यंजनादि असल्यास 'अ' ) जोडला जातो. परंतु पालींत भूतकाळ व संकेतार्थ यांचीं रूपें बनविताना धातूमागें 'अ' विकल्पानें जोडला जातो. ( व्यंजनादि धातु असल्यास 'अ'. स्वरादि धातूला अ, आ, न लागता सुद्धा मूळ धातूवरून भूतकाळ व संकेतार्थांची रूपें वाङ्मयांत आढळतात. ) जसें –भूतकाळ–अनमिं अनमिंसु प्र. पु. किंवा नमिं नमिंसु प्र. पु. संकेतार्थ–अनमिस्स अनमिस्संसु प्र. पु. किंवा नमिस्स नमिस्संसु प्र. पु.

१. त्वान्त अव्ययः–संस्कृतात उपसर्गयुक्त धातूचें त्वान्त अव्यय (पूर्वकाल-वाचक धातुसाधित अव्यय) तयार करावयाचें असल्यास त्वान्ताचा 'य' प्रत्यय लागतो. जसें.–आ+गम्, गच्छ्–आगम्य, आगत्य. प्र+क्षिप्–प्रक्षिप्य. प्र+विश्–प्रविश्य. अभि+रुह्–अभिरुह्य. परंतु पालींत उपसर्गयुक्त धातूला त्वा, त्वान, तून, य, ह्या त्वान्त प्रत्ययांपैकीं कोणताहि प्रत्यय लागून त्वान्त अव्यय (पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यय) बनतें. जसें:–आ+गम–गच्छ–आगन्त्वा, आगम्म. येऊन–प+खिप+त्वा=पक्खिपित्वा, प+खिप+त्वान=पक्खिपित्वान, प+खिप+तून=पक्खिपितून, प+खिप+य=पक्खिप्प–फेकून, टाकून. प्र-

प्रमाणें–प+विस=पविसित्वा, पविसित्वान, पविसिनून, पविस्स–शिह्न अभि+रुह–अभिरुहित्वा, अभिरुहित्वान, अभिरुहितून, अभिरुय्ह–चढून

१० तुमन्त०–धातूला तु, तवे, ताये, हे प्रत्यय लागून हेत्वर्थक धातु साधित अव्यय बनतें कीळ (क्रीड्)– कीळितु कीळितवे, कीळिताये तुमर्थ . . ३।४।९ या पाणिनिसूत्रानें वेदात 'तवे' प्रत्यय लागून तुमन्त अव्यय बनतें. जसें.–सूतवे, कर्तवे.

११. सधि –पालीत ऋ, ॠ, ऌ, ऐ, औ, हे पाच स्वर, श, ष, हीं दोन व्यजनें व विसर्ग नाहींत. म्हणून याच्यामुळें होणारे सस्कृतातील संधिनियम पालींत कमी झालें. सवर्णसधि, गुणसधि, परलोपसधि, पूर्वलोपसधि, इति संधि, अपिसधि, या सधींचा नेहमीं पाली वाङ्मयात उपयोग होतो.

१२. प्रयोग.–कर्तरि–कर्माणि व भावे हे तीन प्रयोग सस्कृतप्रमाणें होतात. धातूला कर्मणीचा 'य' जोडण्यापूर्वी धातूच्या अन्त्य स्वराचा लोप होऊन त्याच्या जागीं ह्रस्व किंवा दीर्घ 'इ' हा स्वर विकल्पानें होतो जसें–नम–नम्+इ (ई) + य + ते=नमियते (नामियति–ते). याचियते, याचीयते. सादियति, सादीयते. कीळियते, कीळीयते. पा–पीयते. दा–दीयते धा–धायते.

टीप०–आकारान्त धातूच्या अत्यस्वराचा लोप होऊन तेथे दीर्घ 'ई' हा स्वर विकल्पानें होतो. इवण्णागमो वा। क० व्या. ११ सू.

१३. प्रयोजक, नामधातु, इच्छार्थक, वगैरेंचा सस्कृतप्रमाणेंच थोड्या फरकानें उपयोग करतात. तद्वत् समास प्रकरण सस्कृतप्रमाणेंच जाणावें.

१४. सख्या मांडण्याची रीत

पालींत आकडे उजवीकडून डावीकडे किंवा डावीकडून उजवीकडे अधिक मोजावयाचे असतात.

वेदांत डावीकडून उजवीकडे मोजणें —३६० (विद्वान्) त्रीणि च शतानि षष्टिश्चानूच्यानि यशकामस्य। वर्षांचे ३६० दिवस. त्रीणि च

वै सतानि पञ्चि सवत्सरस्याहानि । तद्वत् पालींत.—७७०० सुत्ते. सत्त सुत्तसहस्सानि सत्त सुत्तसतानि च ।

उजवीकडून डावीकडे मोजणें—५५० जातकें. अपण्णकजातकादीनि पञ्जासाधिकानि पच जातकसतानि ।

१०१ एकाधिक सत, एकुत्तर सत. २२८ विद्यार्थी. अट्ठवीसति द्विसत माणवका.

९२७ शिपाई. सत्तवीसति अधिक नवसत (नि) राजपुरिसा. किंवा सत्तवीसति राजपुरिसनवसत (तानि) ।

१२० योजन. वीसति अधिक सत (तानि) योजनानि. किंवा वीस योजनसत.

---

नमो बुद्धाय ।

# पालिभाषा–प्रवेश



## पालि वर्णमाला

स्वर ८ —( १ ) अ, इ, उ–ह्रस्व स्वर
( २ ) आ, ई, ऊ–दीर्घ स्वर
( ३ ) ए, ओ–दीर्घ व सयुक्त

सस्कृतमध्यें तेरा स्वर आहेत. त्यापैकीं ऋ, ॠ, ऌ, ऐ, औ हे पाच स्वर पालींत नाहींत.

व्यंजनें ३२ —

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| क[१] | ख[२] | ग[३] | घ[४] | ङ[५] | | | कवर्ग |
| च[६] | छ[७] | ज[८] | झ[९] | ञ[१०] | | | चवर्ग |
| ट[११] | ठ[१२] | ड[१३] | ढ[१४] | ण[१५] | | | टवर्ग |
| त[१६] | थ[१७] | द[१८] | ध[१९] | न[२०] | | | तवर्ग |
| प[२१] | फ[२२] | ब[२३] | भ[२४] | म[२५] | | | पवर्ग |
| य[२६] | र[२७] | ल[२८] | व[२९] | स[३०] | ह[३१] | ळ[३२] | |

सस्कृतमध्यें ३३ व्यजनें आहेत. श, ष, हीं दोन व्यजनें पालींत नाहींत. ळ, हें व्यजन अलिकडच्या सस्कृतात नाहीं. तें पालींत अधिक आहे.

वैदिक सस्कृत ( वेद ज्या भाषेंत आहेत ती भाषा ) व रामायण, महाभारत, नाटकें वगैरेमधील सस्कृत असे दोन प्रकार आहेत. पैकीं वैदिक सस्कृतात ' ळ ' हें व्यजन सापडतें. उदाहरण—अग्निमीळे पुरोहितम् ।

मराठींत ३६ व्यजनें आहेत.

क्+ष्+अ=क्ष. ज्+ञ्+अ=ज्ञ.

संस्कृतपेक्षां क्ष, ज्ञ, ळ हीं व्यंजनें हल्लीं मराठींत अधिक मानतात पालींत विसर्ग नाहीं; मात्र अनुस्वार आहे.

( अ ) वरील व्यंजनांचे मृदु व कठोर असे दोन भेद आहेत.

( आ ) प्रत्येक वर्गातील शेवटचीं तीन व्यंजनें आणि य, र, ल, ळ व, ह, मिळून एकवीस मृदु व्यंजनें होत.

( इ ) प्रत्येक वर्गातील पहिलीं दोन व्यजनें आणि स अशीं अव कठोर व्यंजनें आहेत.

---

# भाषा-नियम

## ( १ ) स्वरपरिवर्तन

१. (अ) संस्कृतांतील ऋ बद्दल अ होतो. (१ ऋतोऽत् प्रा. प्र. १.२७

| | | |
|---|---|---|
| नृत्य | नच्च | —नाच |
| कृष्ण | कण्ह | —कान्हा |
| मृत | मत | —मद |
| वृद्धि | वड्ढि | —वाढ |
| घृत | घत | —तूप |
| कृत | कत | —केलेलें |
| कृषि | कसि | —शेतकी |
| मृत्तिका | मत्तिका | —माती-मट्टी |
| शृंगाल | संगाल | —शागळी |
| हृदय | हृदय | —हृदय. |

(आ) संस्कृतांतील ऋ बद्दल इ होते. (इद् ऋष्यादिषु प्रा. प्र. १. २८)

| | | |
|---|---|---|
| शृंग | सिंग | —शिंग |
| कृश | किस | —लुकडा |
| ऋण | इण | —कर्ज |
| ऋषि | इसि | —ऋषि |
| मृग | मिग | —हरिण |

| | | |
|---|---|---|
| तृण | तिण | —गवत |
| कृमि | किमि | —किडा |
| शृगाल | सिगाल | —कोल्हा |
| कृत्य | किच्च | —कृत्य |

(इ) संस्कृतांतील ऋ बद्दल उ होतो. (उद् ऋत्वादिषु प्रा. प्र. १-२९)

| | | |
|---|---|---|
| वृष्टि | वुट्ठि | —पाऊस |
| ऋतु | उतु | —ऋतु |
| मृदु | मुदु | —मऊ |
| ऋषभ | उसभ | —बैल |
| वृद्ध | वड्ढ | —बुड्ढा ( हिंदी ) |
| मृषा | मुसा | —खोटें |

२. संस्कृतांतील अ बद्दल आ होतो. अल्का आल्का–कुबेरनगरी, ८ ते १० वर्षांची मुलगी. अलिन्द आलिन्द–ओटा. प्रत्यमित्र पच्चामित्त–शत्रु.

३. अ बद्दल इ होतो. चन्द्रमा चन्दिमा–चद्र.

४. अ बद्दल उ होतो. कदाचन कुदाचन–एकदा, केव्हाहि. नवति नवुति–नव्वद. असूया उसूया–मत्सर, निंदा. सद्य' सज्जु–तावडतोब. पृथग्जन पुथुज्जन–सामान्य लोक.

५. आ बद्दल उ होतो. सम्मार्जनी सम्मुज्जनी–केरसुणी.

६. अ बद्दल ए होतो. एकशय्या एकसेय्या–एकबिछाना. फल्गु फेग्गु–साल. फग्गु फाल्गुननक्षत्र. त्याज्य.

७. इ बद्दल उ होतो. इषु उसु–बाण. इक्षु उच्छु–ऊस. पिचुमन्द पुचिमन्द–कडुलिंब.

८. ई बद्दल ए होतो. अग्रमहिषी अग्गमहेसी–पट्टराणी. निषाद नेसाद–चांडाळ, गाण्यांतला ७ वा स्वर. डिण्डिम डेण्डिम–दवंडी पिटण्याचें वाद्य.

९. इ बद्दल अ होतो. पुष्करिणी पोक्खरणी-कमळांनी युक्त हौद, तळें. पृथिवी पठवी-पृथ्वी.

१०. इ बद्दल ए होतो. विमध्य वेमज्झ-मध्यभाग.

११. उ बद्दल अ होतो. गुरु गरु-गुरु, श्रेष्ठ. मुकुल मकुल-कळी (किंचित् उमल्लेली).

१२. उ बद्दल इ होतो. पुरुष पुरिस-पुरुष. जुगुप्सा जिगुच्छा-किळस.

१३. उ बद्दल ओ होतो. प्रामुख्य पामोक्ख-प्रसिद्ध. पुष्करिणी पोक्खरणी-कमळांनी युक्त हौद, तळें. शुण्डा सोण्डा-सोंड.

१४. ऐ बद्दल ओ होतो. द्वेष दोस-द्वेष.

१५. ओ बद्दल उ होतो. होत्र हुत्त-हवन केलेलें.

१६. ऐ बद्दल ए होतो. (ऐत एत् १ प्रा. प्र. १-३५). तैल तेल-तेल. शैल सेल-पर्वत. वैर वेर-वैर. वैशाख वेसाख-वैशाख. (महिन्याचें नाव). भैरव भेरव-भयंकर. वैमानिक वेमानिक-विमानांत वसणारा. विमान-राजवाडा (देवाचा) विमानवत्थु. राजवाड्यांत वसणारा० ऐरावण एरावण-इंद्राचा हत्ती. वैहायस वेहास(य)-आकाश.

१७. ऐ बद्दल इ होतो. ऐश्वर्य इस्सरिय-ऐश्वर्य. सैन्धव सिन्धव-घोडा.

१८. औ बद्दल ओ होतो. (औत् ओत् प्रा. प्र. १-४१) औषध ओसध-औषध. शौण्ड सोण्ड-हुशार. गौतम गोतम-भगवान गौतम बुद्ध. पौर पोर-नागरिक, शहरसंबंधी. औदुम्बर ओदुम्बर-उंबर, पुष्कळ उंबरांचा प्रदेश. औपम्य ओपम्म-तुलना, सारखेपणा.

१९. औ बद्दल उ होतो. मौक्तिक मुत्तिक-मोती. औत्सुक्य उस्सुक-उत्कट इच्छा.

२०. औ बद्दल आ होतो. (आच्च गौरवे १-४३) गौरव गारव-आदर; सन्मान.

२१. औ बद्दल अ होतो. सौम्य सम्म-मित्रा, अरे.

## ( २ ) व्यंजनपरिवर्तन

२२. क बद्दल ख होतो. कील खील-खिळा. इन्द्रकील इन्दखील-इन्द्रखीलस्तंभ. कुब्ज खुज्ज-खुजा. शुनक सुनख-कुत्रा.

२३. (अ) ग बद्दल क होतो. तडाग तळाक-तळें. छागल छाकल-बोकड.

(आ) घ बद्दल ह होतो. लघु लहु-लहान.

२४. (अ) ड बद्दल ळ होतो. गुड गुळ-गूळ. दाडिम दाळिम-डाळिंब. षोडश सोळस-सोळा. क्रीडा कीळा-खेळ. तडाग तळाक-तलाव.

( आ ) ट बद्दल ळ होतो. स्फटिक फळिक-स्फटिक.

( इ ) द बद्दल ळ होतो. दोहद दोहळ-डोहाळा.

२५. ढ बद्दल ल्ह होतो. आषाढ आसाल्ह-आषाढ महिना.

२६. प बद्दल फ होतो. परशु फरसु-कुऱ्हाड. परुष फरुस-कठोर. पलित फलित-केस पिकलेला.

२७. भ बद्दल ह होतो. प्रभु पहु-समर्थ. प्रभूत पहूत-पुष्कळ.

२८. य बद्दल व होतो. आयुध आवुध-आयुध.

२९. र बद्दल ल होतो. मारुत मालुत-वारा.

३०. ल बद्दल न होतो. ललाट नलाट-कपाळ. लाङ्गल नगल-नागर.

३१. श, ष, बद्दल छ होतो. शावक छापक-छावा, पिलू. षष्ठ छट्ट-सहा. षड्विंशति छव्विसति-सव्वीस.

३२. ध बद्दल ह होतो. ह बद्दल ध किंवा भ होतो. रुधिर रुहिर-रक्त. इह इध-येथें. मित्तदुभी-मित्रद्रोही, मित्रद्वेषी.

## ( ३ ) संयुक्तव्यंजनपरिवर्तन

३३. (अ) संस्कृतांतील दीर्घ स्वरापुढें संयुक्त व्यंजन किंवा अनुस्वार आल्यास मागील दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो. ( दीर्घस्य ऱ्हस्वः संयोगानुस्वारयोः। ) संयुक्त व्यंजनाचीं उदाहरणें.—मार्ग मग्ग-रस्ता. काष्ठ कट्ठ-काठी. मार्जार मज्जार-मांजर. ईश्वर इस्सर-ईश्वर.

पराक्रम परक्कम-पराक्रम. कूर्म कुम्म-कासव.

अनुस्वाराचीं उदाहरणें.—शालाम्-साल. नदीम्-नदिं.

(आ) ऱ्हस्व स्वरावरील अनुस्वाराचा लोप होऊन तो ऱ्हस्व स्वर दीर्घ होतो. सिंह सीह–सिंह. विंशति वीसति–वीस. दंष्ट्रा दाठा–दाढ. संदंश संडास–सांडशी; चिमटा.

(इ) दीर्घ स्वरावर अनुस्वार येऊन तो दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो. सनातन सनंतन–जुना.

(ई) दीर्घ स्वरावर अनुस्वार असला तर तो दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो. मांस मंस–मास. पांशु पंसु–धूळ.

( टीप:—पालींत कांहीं अपवादात्मक शब्दांखेरीज शब्दाच्या आरंभीं जोडाक्षर येत नाहीं. स्खलित खलित–चूक होणें. )

३४. आदि ध्य बद्दल झ होतो. ध्यान झान–ध्यान.

३५. मध्य व अंत्य ध्य बद्दल ज्झ होतो. अध्याशय अज्झासय–इच्छा. अध्यापक अज्झापक–शिक्षक. अध्ययन अज्झयन–अभ्यास. स्वाध्याय सज्झाय–अभ्यास.

३६. स्क बद्दल क्क होतो. नमस्कार नमक्कार–नमस्कार. संस्कृत सक्कत ( सखत )–संस्कृत.

३७. स्क बद्दल ख होतो. संस्कार संखार–संस्कार. संस्कृत संखत–संस्कृत. स्कन्ध खंध–खांदा.

३८. मध्य व अंत्य ष्क बद्दल क्क होतो. दुष्कर दुक्कर–करण्यास कठीण. चतुष्क चतुक्क–चौक (चार रस्ते मिळालेलें ठिकाण). निष्कषाय निक्कसाव–दोषी.

३९. मध्य व अंत्य ष्क बद्दल क्ख होतो. शुष्क सुक्ख–सुकलेलें. पुष्करिणी पोक्खरणी–कमलांनीं युक्त तळें. परिष्कार परिक्खार–तीनचीवर, भिक्षापात्र, वस्तारा, सुई, कमरपट्टा यांस श्रमणपरिष्कार म्हणतात, सामग्री.

४०. श्च बद्दल च्छ होतो. आश्चर्य अच्छरिय–आश्चर्य. पश्चात् पच्छा–नंतर. वृश्चिक विच्छिक–विंचू. निश्चय निच्छय–निश्चय.

४१. स्प बद्दल फ होतो. स्पर्श फस्स–स्पर्श. स्पृष्ट फुट्ठ–स्पर्श केलेलें. स्पन्दन फन्दन–चंचल.

४२. स्फ बद्दल फ होतो. स्फुटन फुटन–फुटणें. स्फटिक फटिक–स्फटिक. स्फोट–फोट.

४३. स्प बद्दल प्प होतो. वनस्पति वनप्पति–वनस्पति.

४४. ष्प बद्दल प्प होतो. चतुष्पद चतुप्पद–चार पायांचा प्राणी. बाष्प बप्प–अश्रु.

४५. ष्प बद्दल प्फ होतो. पुष्प पुप्फ–फूल. शष्प सप्फ–कोंवळें गवत.

४६. प बद्दल फ होतो. परशु फरसु–कुऱ्हाड. पलित फलित–केस पिकलेला. परुष फरुस–कठोर.

४७. अव बद्दल ओ होतो. व्यवहार वोहार–व्यवहार. लवण लोण–मीठ.

४८. व्य बद्दल व होतो. व्यायाम वायाम–व्यायाम, प्रयत्न. व्यवस्था ववत्था–व्यवस्था. अपवाद—व्यापार–व्यापार. व्याकुल–व्याकुल. व्यंजन–व्यंजन.

४९. श्न बद्दल ण्ह होतो. प्रश्न पण्ह–प्रश्न.

५०. ष्ण बद्दल ण्ह होतो. तृष्णा तण्हा–तहान ( अतृप्ति ). कृष्ण कण्ह–कान्हा, काळा. उष्ण उण्ह–ऊन, ऊन्ह. उष्णीष उण्हीस–पागोटें. तूष्णीं तुण्हीं–मुकाट्यानें. पार्ष्णि पण्हि–टाच.

५१. ( अ ) संस्कृत शब्दांच्या जोडाक्षरांतील पहिल्या वर्णांचा लोप होतो व उरलेला वर्ण द्वित्व पावतो. मुक्त मुत्त–सुटलेला, मोक्ष मिळविलेला. सत्कार सक्कार–सत्कार. शब्द सद्द–शब्द.

(आ) परंतु उरलेला वर्ण आपल्या वर्गातील दुसरा असल्यास द्वित्व केलेल्या वर्णांच्या ऐवजीं त्याच्याच वर्गातील पहिला वर्ण होतो, किंवा उरलेला वर्ण चवथा असल्यास द्वित्व केलेल्या वर्णांच्या ऐवजीं त्याच्याच वर्गातील तिसरा वर्ण होतो.

अर्थ (अथ्थ)–अत्थ. दुग्ध (दुध्ध) दुद्ध–दूध. अनर्घ (अनघ्घ) अनग्घ–अमौलिक.

५२. (अ) सर्व ठिकाणीं संयुक्त व्यंजनांतील 'र' चा लोप होतो व उरलेला वर्ण द्वित्व पावतो. ( सर्वत्र रस्य लोपः। ) कर्ण कण्ण–कान. पर्ण पण्ण–पान.

कर्म कम्म-काम. चक्र चक्क-चाक. चर्म चम्म-चामडें. घर्म घम्म-घाम पत्त पत्र-पान, मार्डे. प्राप्त-(पत्ता), मिळालेलें. अपवाद---शर्करा सक्खरा-साखर. दीर्घ दीघ-दीर्घ. आदर्श आदास-आरसा. गर्दभ गद्रभ-गाढव चन्द्र चन्द-चद्र. शीघ्र सीघ-त्वकर. शीर्ष सीस-डोकें.

Give Sanskrit equivalents of —संस्कृत प्रतिशब्द द्याः— वग्ग, दुब्बल, वण्ण, भद्द, समुद्द, सप्प, धम्म, पुत्त.

(आ) संस्कृत शब्दाच्या आरभीं 'र'युक्त जोडाक्षर असल्यास त्यातील 'र'चा लोप होतो. परतु उरलेला वर्ण द्वित्व पावत नाहीं. ग्राम गाम-गाव. प्रजा पजा-लोक. ग्रथ गथ-ग्रथ. प्रिय पिय-आवडता. प्रकार पकार-प्रकार. स्खलित खलित-चूक, अडखळणें. प्रपञ्च पपञ्च-प्रपञ्च, ससार. अपवाद-द्वार द्वार-दरवाजा. *ब्राह्मण ब्राह्मण-ब्राह्मण.* पाली प्रतिशब्द द्या—स्वर, स्वामि, प्राण, व्रण.

(इ) अनुस्वारानतर सयुक्त व्यजनात 'र' आल्यास र चा लोप होतो, परतु उरलेला वर्ण द्वित्व पावत नाहीं. सत्रास सतास-त्रास. मन्त्र मन्त-मत्र. यन्त्र यन्त-यत्र.

५३. र्य बद्दल रिय होतो व र्य मागील दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो. भार्या भरिया-बायको. सूर्य सुरिय-सूर्य. आर्य अरिय-श्रेष्ठ, कदर्य कदरिय-कृपण, चिक्कू.

Give Pāli equivalents of —पाली प्रतिशब्द द्या—आचार्य, वीर्य, चर्या.

५४. ए नतर 'य' आल्यास तो य द्वित्व पावतो. गेयम् गेय्यं-गाण्याजोगें पेयम् पेय्यं-पिण्याजोगें. पाथेय पाथेय्य-शिदोरी. श्रेयस् सेय्य-चागलें.

५५. जेव्हा म, न, य, व, हीं व्यजनें 'ह' या वर्णास जोडून येतील तेव्हां त्याचा लोप न होता वर्णविपर्यय होतो. सह्य-सय्ह. वह्नि वन्हि-अग्नि. अपवाद---ब्राह्मण-ब्राह्मण. ब्रह्म-ब्रह्म.

५६. आदि ( आरभींच्या ) त्य बद्दल च होतो. त्याग चाग-त्याग.

५७. मध्य व अत्य ( शेवटच्या ) त्य बद्दल च्च होतो. प्रत्येक पच्चेक-प्रत्येक. नृत्य नच्च-नाच. नित्य निच्च-नेहमीं.

Give Sanskrit equivalents of —संस्कृत प्रतिशब्द द्याः—अच्चेत, सच्च.

५८. आदि द्य बद्दल ज होतो. द्युति जुति–कांति.

५९. अन्त्य ( शेवटच्या ) द्य बद्दल ज्ज होतो. मद्य मज्ज–दारू. अद्य अज्ज–आज. वैद्य वेज्ज–वैद्य. वद्य वज्ज–निंद्य. दायाद्य दायज्ज–मिळकतीचा वाटा. अपवाद—उद्यान उय्यान–बाग.

Give Pāli equivalents of —पाली प्रतिशब्द द्या —विद्यु, विद्या, सद्य.

६०. संयुक्त व्यंजनांतील र्व चा ब्ब होतो. पर्वत पब्बत–पर्वत. सर्व सब्ब–सर्व, हिंदी सब. काव्य कब्ब–काव्य. पूर्व पुब्ब–प्रथम. अपवाद–यौवन योब्बन–तारुण्य.

६१. आदि क्ष बद्दल ख होतो. क्षीर खीर–दूध. क्षेत्र खेत्त–शेतीवाडी. क्षय खय–नाश. क्षत्रिय खत्तिय–क्षत्रिय. क्षान्ति खन्ति–शान्ति. संस्कृत प्रतिशब्द द्या —खिप्प, खण, खीण.

६२. मध्य व अन्त्य क्ष बद्दल क्ख होतो. निक्षेप निक्खेप–ठेवा. भिक्षा भिक्खा–भीक. भिक्षाचारी भिक्खाचारी–भिकारी. पक्ष पक्ख–पंख. शिक्षा सिक्खा–शिकणें, सीखना. (हिंदी). चक्षु चक्खु–डोळा. अपवाद–तक्षशिला तक्कसिला–गांधार देशांतील एका प्राचीन विद्यापीठाचें नांव. लाक्षा लाखा–लाख.

Give Pāli equivalents of —पाली प्रतिशब्द द्याः—अक्षण, विचक्षण, लक्षण, गोरक्षण, बुभुक्षित, यक्ष.

६३. आदि क्ष बद्दल छ होतो. क्षमा छमा–क्षमा. क्षण छण–क्षण.

६४. अन्त्य क्ष बद्दल च्छ होतो. इक्षु उच्छु–ऊस.

६५. थ्य बद्दल च्छ होतो. रथ्या रच्छा–रस्ता. तथ्य तच्छ–खरें.

६६. श्च बद्दल च्छ होतो. आश्चर्य अच्छरिय–आश्चर्य. पश्चिम पच्छिम–हिंदी पछि. निश्चय निच्छय–निश्चय.

६७. मध्य व अन्त्य त्स बद्दल च्छ होतो. उत्संग उच्छंग–मांडी. संवत्सर संवच्छर–वर्ष. वत्स वच्छ–वासरूं, मित्र, पुत्र. चिकित्सा चिकिच्छा–रोगप्रतिकार, नियमन. बीभत्स बीभच्छ–किळसवाणें, निंद्य.

६८. मध्य व अंत्य प्स बद्दल च्छ होतो. अप्सरा अच्छरा–दिव्यांगना, सुंदरी, चुटकी. जुगुप्सा जिगुच्छा–किळस.

६९. आदि न्य बद्दल ञ होतो. न्याय ञाय–न्याय. अपवादः— न्यग्रोध निग्रोध–वड.

७०. मध्य किंवा अंत्य न्य बद्दल ञ्ञ होतो. कन्या कञ्ञा–मुलगी. अन्य अञ्ञ–दुसरा. धान्य धञ्ञ–धान्य.

पाली प्रतिशब्द द्याः—शून्य, वन्य, सामान्य.

७१. अंत्य ण्य बद्दल ञ्ञ होतो. अरण्य अरञ्ञ–जंगल. हिरण्य हिरञ्ञ–सोनें. श्रामण्य सामञ्ञ–श्रमणपणा, सन्यासधर्म.

संस्कृत प्रतिशब्द द्या.—कारुञ्ञ, तारुञ्ञ

७२. आदि ज्ञ बद्दल ञ होतो. ज्ञान ञाण–ज्ञान. ज्ञाति ञाति–जात, नातेवाईक.

७३. (अ) मध्य किंवा अंत्य ज्ञ बद्दल ञ्ञ होतो विज्ञान–विञ्ञाण. प्रतिज्ञा पटिञ्ञा–प्रतिज्ञा. प्रज्ञा पञ्ञा–बुद्धि. संज्ञा सञ्ञा–संज्ञा, खूण. अभिज्ञा अभिञ्ञा–खूण, अलौकिक शक्ति मनोज्ञ मनुञ्ञ–सुंदर.

(आ) अंत्य ज्ञ बद्दल काहीं ठिकाणीं ञ्ञु होतो. कृतज्ञता कतञ्ञुता–कृतज्ञता. कृतज्ञ कतञ्ञु–कृतज्ञ. विज्ञ विञ्ञु–शहाणा. अपवाद—आज्ञा आणा–आज्ञा.

७४. आदि स्त बद्दल थ होतो. स्तन थन–स्तन. स्तंभ थंभ–खांब. स्तोक थोक–थोडें. स्तूप थूप–बौद्ध स्तूप. स्तुति थुति–स्तुति.

७५. मध्य व अंत्य स्त बद्दल त्थ होतो. हस्त हत्थ–हात. मस्तक मत्थक–माथें, डोकें. स्वस्ति सोत्थि–कल्याण.

७६. आदि स्थ बद्दल ठ होतो. स्थान ठान–ठिकाण. स्थाली ठाली–थाळी.

७७. मध्य व अंत्य स्थ बद्दल ट्ठ होतो. प्रमादस्थान पमादट्ठान–चुकीचें ठिकाण. गृहस्थ गहट्ठ–प्रापंचिक मनुष्य. अस्थि अट्ठि–हाड.

७८. मध्य व अंत्य ष्ट बद्दल ट्ठ होतो. यष्टि यट्ठि–काठ. पुष्ट पुट्ठ–लठ्ठ. मुष्टि मुट्ठि–मूठ. दष्ट दट्ठ–चावलेला. दृष्ट दिट्ठ–पाहिलेलें.

Give Sanskrit equivalents of—संस्कृत प्रतिशब्द द्या—
पट्ठ, वुड्ढि, अट्ठ, अवसिट्ठ, तुट्ठि, दुट्ठ.

७९. मध्य व अंत्य ष्ठ बद्दल ट्ठ होतो. कोष्ठागार कोट्ठागार-कोठार. काष्ठ कट्ठ-काठी. श्रेष्ठ सेट्ठ-श्रेष्ठ. प्रतिष्ठा पतिट्ठा-प्रतिष्ठा.

पाली प्रतिशब्द द्या —ओष्ठ, ज्येष्ठ, कनिष्ठ.

८०. शब्दाच्या शेवटीं म, न, य, व आल्यास त्याचा लोप होतो व उरलेला वर्ण द्वित्व पावतो. (म न य वा ना अन्त्याना लोप' द्वित्व शेषादेशयोः) युग्म युग्ग-जोडी. नग्न नग्ग-नागडा. सौम्य सम्म-मित्रा. रम्य रम्म-सुंदर, रमणीय. मनुष्य-मनुस्स. अश्व अस्स-घोडा. विश्व विस्स-जग. पार्श्व पस्स-बाजू.

पाली प्रतिशब्द द्या —चाणक्य, मित्र, पक्व, महत्त्व, राज्य, शक्य, सत्त्व, हास्य, शल्य, आढ्य.

८१. श्म, ष्म, स्म बद्दल म्ह होतो. अश्म अम्ह-दगड. ग्रीष्म गिम्ह-ग्रीष्मऋतु. श्लेष्म (न.) सेम्ह-कफ. अपवाद.—रश्मि रश्मि-किरण.

८२. अपवादात्मक शब्दः—क्लेश किलेस-त्रास. ग्लान गिलान-आजारी. ग्लान मिलान-म्लान. श्री सिरी-श्री. ह्री हिरी-लाज. ज्या जिया-धनुष्याची दोरी. चैत्य चेतिय-देऊळ. ह्यस् हिय्यो-काल.

---

## पठमो पाठो

पूर्वतयारी —बुद्ध, अम्ह, तुम्ह हे शब्द पाठ करणें.

### क्रियापदपरिचय (तिङन्त)

पालीमध्यें संस्कृतप्रमाणें परस्मैपद व आत्मनेपद आहेत. पण संस्कृतप्रमाणें निश्चित नसून प्रत्येक धातु विकल्पें करून उभयपदी असू शकतो. तसेंच आत्मनेपदाचा उपयोग क्वचित् आढळतो. ज्या क्रियेचें फल परस्मै म्हणजे दुसऱ्याकरितां असतें तें क्रियापद परस्मैपदी, ज्या क्रियेचें फल आत्मने म्हणजे स्वत:करिता असतें तें क्रियापद आत्मनेपदी. परंतु ही स्थिति संस्कृतांत दिसत नाहीं, तद्वत् पालींतहि दिसून येत नाहीं. संस्कृतप्रमाणें पालींत धातु दहा गणांत विभागलेले आहेत. संस्कृतमध्यें धातु दहा प्रकारांत चालतो.

उदाहरणार्थः—१ वर्तमानकाळ, २ अनद्यतन भूतकाळ, ३ परोक्षभूत; ४ सामान्यभूत ( लुङ् ), ५ सामान्यभविष्य ( लृट् ), ६ अनद्यतन भविष्य ( लुट् ) असे सहा काळ आणि ७ आज्ञार्थ ( लोट् ), ८ विध्यर्थ ( विधिलिङ् ), ९ क्रियातिपत्यर्थ (लृङ्); १० आशीर्वादार्थ (आशीर्लिङ्) असे चार अर्थ आहेत. पालींत भविष्यकाळाचा एकच प्रकार आहे. तद्वत् संस्कृतांतील भूतकाळच्या तीन प्रकारांपैकीं पालींत प्रथम किंवा तृतीय भूतकाळाचा नेहमीं उपयोग करतात. द्वितीय भूतकाळाचा उपयोग क्वचितच आढळतो.

| गण ( conjugation ) | विकरण ( sign ) |
|---|---|
| प्रथम गण | अ |
| द्वितीय गण | अ ( लोप ) |
| तृतीय गण | अ ( लोप ) |
| चतुर्थ गण | य |
| पञ्चम गण | नो (णो) ना ( णा ) |
| षष्ठ गण | अ |
| सप्तम गण | निग्गहित (अनुस्वार) किंवा अनुनासिक |
| अष्टम गण | ओ |
| नवम गण | ना |
| दशम गण | अय, ए |

प्रत्यय Terminations

(१) वर्तमानकाळ Present Tense

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
|---|---|---|---|---|
| ए. व. | ब. व. | | ए. व. | ब. व. |
| मि | म | प्रथम पुरुष | ए | म्हे |
| सि | थ | द्वितीय पुरुष | से | व्हे |
| ति | अन्ति | तृतीय पुरुष | ते | अन्ते |

(२) आज्ञार्थ Imperative ( पाली–पञ्चमी )

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
| --- | --- | --- | --- | --- |
| मि | म | प्र. पु | ए | आमसे |
| हि | थ | द्वि पु. | स्सु | व्हो |
| तु | अन्तु | तृ. पु. | त | अन्त |

भूतकाळ Past Tense ( पाली–हीय्यत्तनी )

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
| --- | --- | --- | --- | --- |
| इ | इम्ह | प्र. पु. | इ | म्हसे |
| इ | इत्थ | द्वि. पु | से | व्हे |
| इ | इसु, उ | तृ. पु | इत्थ | उ |

विध्यर्थ Potential ( पाली–सत्तमी )

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
| --- | --- | --- | --- | --- |
| एय्यामि | एय्याम | प्र. पु. | एय्य, ए | एय्याम्हे |
| एय्यासि | एय्याथ | द्वि पु. | एथो | एय्यव्हो |
| ए, एय्य | एय्यु | तृ पु. | एथ | एर |

भविष्यकाळ Future Tense ( पाली–भविस्सन्ती )

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
| --- | --- | --- | --- | --- |
| इस्सामि | इस्साम | प्र. पु. | इस्स | इस्साम्हे |
| इस्ससि | इस्सथ | द्वि. पु | इस्ससे | इस्सव्हे |
| इस्सति | इस्सन्ति | तृ. पु. | इस्सते | इस्सन्ते |

संकेतार्थ Conditional ( पाली–कालातिपत्ति )

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
| --- | --- | --- | --- | --- |
| इस्स | इस्सम्ह | प्र. पु. | इस्स | इस्साम्हसे |
| इस्स | इस्सथ | द्वि. पु. | इस्ससे | इस्सव्हे |
| इस्स | इस्समु | तृ. पु. | इस्सथ | इस्सिंसु |

वरील काळीं व अर्थी लागणारे पुरुषवाचक प्रत्यय परस्मैपदी व आत्मनेपदी असे दोन प्रकारचे आहेत. संस्कृतप्रमाणें पालींत उभयपदी

धातू आहेत. (कोणताहि धातु परस्मैपदी व आत्मनेपदी चालतो.) तद्वत् सर्व गणांचे प्रत्यय सारखेच आहेत.

संस्कृतमध्ये १, ४, ६, १० या गणाचा एक गट व २, ३, ५, ७, ८, ९ या गणांचा दुसरा गट आहे. त्यामुळें प्रत्ययादि निराळे आहेत.

(१) या गणातील धातूंना अ हें विकरण लागून त्याचें अंग बनतें. धातू व प्रत्यय यांच्यामध्यें विकरण लागतें.

(२) कांहीं धातूंना विशिष्ट आदेश होतात.

जसें:—गम (गच्छ); पा (पिब).

(३) प्रत्ययाच्या आरंभीं 'म' आल्यास धातूंतील अ चा आ होतो.

(४) प्रत्ययाच्या आरंभीं स्वर आल्यास धातूंतील शेवटच्या अ चा लोप होतो. (फळ्यावर लिहिणें व समजून देणें.)

| गण | धातु | विकरण | वर्तमानकाळ प्र. पु. ए. व. प्रत्यय |
|---|---|---|---|
| १ | नम | अ | मि. |

'नम' हा धातू पहिल्या गणांतील असल्यामुळें त्याला 'अ' विकरण लागतें.

(टीप.—संस्कृतमध्यें बरेच धातु व्यंजनान्त असतात.)

जसें:—नम्, पत्, रक्ष वगैरे. परंतु वरील सर्व धातु स्वरान्त असतात जसें—नम, पत, रक्ष म्हणून विकरण जोडण्यापूर्वी एकापेक्षां अधिक स्वर असणाऱ्या धातूच्या अंत्य स्वराचा लोप होतो. नम + अ = नम् + अ = नम. आता आपल्याला वर्तमानकाळाचें प्रथम पुरुषाचें एकवचनाचें रूप तयार करावयाचें आहे आणि त्याचा प्रत्यय मि असा आहे.

नम + मि. नियम तीन प्रमाणें नमामि असें रूप तयार झालें. तद्वत् नम् + अ = नम + म = नमाम.

नम् + अ = नम + सि = नमसि. नम् + अ = नम + थ = नमथ. नम् + अ = नम + ति = नमति, नम् + अ = नम - नम् + अन्ति = नियम चार प्रमाणें नमन्ति.

## प्रथमगण

### वर्तमानकाळ

नम—नमस्कार करणें.

| कर्ता | ए. व. | कर्ता | व. व. | |
|---|---|---|---|---|
| अह ( मी ) | नमामि | मयं किंवा अम्हे (आम्ही) | नमाम | प्र. पु. |
| त्व ( तू ) | नमसि | तुम्हे (तुम्ही) | नमथ | द्वि. पु. |
| सो (तो), सा (ती) | नमति | ते ( ते ), ता (त्या), | नमन्ति | तृ. पु. |
| पुत्तो(मुलगा), कञ्ञा(मुलगी) | | पुत्ता (मुलगे), कञ्ञायो मुली | | |

ओ + वद—उपदेश करणें.

| | | |
|---|---|---|
| ( अह ) ओवदामि | ( अम्हे ) ओवदाम | प्र. पु. |
| ( त्व ) ओवदसि | ( तुम्हे ) ओवदथ | द्वि. पु. |
| ( बुद्धो ) ओवदति | ( पण्डिता ) ओवदन्ति | तृ. पु. |

दिस ( दृश् )—पाहणें

दिस या धातूला पस्स, दिस्स, दक्ख, असे आदेश विकल्पानें होतात. ' दिसस्स पस्स दिस्स दक्खा वा ' दिस इच्चेतस्स धातुस्स पस्स दिस्स दक्ख इच्चेते आदेसा होन्ति वा।

दिस्सति, पस्सति दक्खति। [ कच्चायन व्याकरण, आख्यातकप्प, ततियकण्ड सू. १४. ]

द्विकर्मकधातु:—पुढील धातु द्विकर्मक आहेत. दोन कर्मे ज्याना लागतात ते धातु द्विकर्मक होत. याच १ ग०—मागणें. पच १ ग०—शिजविणें.

दण्ड १० ग०—शिक्षा करणें. पुच्छ ( प्रच्छ्—पृच्छ् ) ६ ग०—विचारणें. चि ९ ग०—गोळा करणें. ब्रू २ ग०—बोलणें,

नी ( नय ) १ ग०—नेणें. हर ( हृ हर् ) १ ग०—हरण करणें. वह १ ग०—वाहून नेणें. हे धातु व या अर्थाचे दुसरे धातु द्विकर्मक होत.

उदाहरण:—( १ ) मनुस्सो भूप धन याचति। मनुष्य राजाजवळ द्रव्य मागतो.

( २ ) आचरियो माणवक पञ्ह पुच्छति । *शिक्षक विद्यार्थ्याला प्रश्न विचारतो.*

( ३ ) बुद्धो मनुस्स धम्म ब्रूति । बुद्ध मनुष्याला धर्म सागतो.

( ४ ) कसको गोण गाम नयति । *शेतकरी बैल गावाला नेतो.*

( ५ ) चोरा धन घर वहन्ति । *चोर घरीं द्रव्य वाहून नेतात.*

## विभक्तिरूपें

१. नामें, विशेषणें, सर्वनामें, सख्यावाचक याची *विभक्तिरूपें नीट* समजावींत म्हणून विशेषणाकरिता, सर्वनामाकरिता, सख्यावाचकांकरिता पुढें स्वतत्र धडे दिले आहेत

२. *पालींत मराठीप्रमाणें* पुल्लिंग, *स्त्रीलिंग*, नपुसकलिंग, *अशीं तीन* लिंगें आहेत वचनें मात्र एकवचन आणि बहुवचन अशीं दोन आहेत, एकापेक्षा अधिक व्यक्ति, पदार्थ, वगैरे दाखवावयाचे असल्यास बहु-वचनाचा उपयोग करावा लागतो

३. पालींत *खालीलप्रमाणें* सात विभक्त्या आहेत

विभक्त्या अर्थ

पठमा ( प्रथमा ) Nominative --कर्ता The subject

दुतिया ( द्वितीया ) Accusative -- कर्म The Object

ततिया ( तृतीया ) *Instrumental कारण, साधन* The person or thing with *or* by whom something is *performed*

चतुर्थी ( चतुर्थी ) *Dative --सप्रदान ज्याला द्यावयाचें तो सप्रदान.* The person to whom or for whom something is given

पचमी *Ablative* --अपादान ज्याच्यापासून वियोग होतो किंवा क्रिया घडते तें अपादान Shows the starting point

छट्ठी (षष्ठी) Genitive --सबध Stands for the possessive in English

सत्तमी ( सप्तमी ) Locative -- अधिकरण, क्रियेची जागा. Shows the place in, on, upon, at etc

आल्पन ( सबोधन ) Vocative -- ज्याला हाक मारावयाची तो. Is used to address persons

## पाली-विभक्तिरूपांचें मराठी व इंग्रजी भाषांतर—

| | पाली एक व० | मराठी | इंग्रजी |
|---|---|---|---|
| प्रथमा | बुद्धो | बुद्ध | Buddha |
| द्वितीया | बुद्धं | बुद्धास, बुद्धाला, बुद्धाप्रत. | to Buddha |
| तृतीया | बुद्धेन | बुद्धानें, बुद्धामुळें, बुद्धाकडून, बुद्धाच्या द्वारें | by, with, through Buddha |
| चतुर्थी | बुद्धाय | बुद्धास, बुद्धाला, बुद्धासाठीं,-करितां-स्तव. | to, for Buddha |
| पंचमी | बुद्धा-स्मा-म्हा | बुद्धाहून-पेक्षा-पासून-कडून. | from, than, Buddha |
| षष्ठी | बुद्धस्स | बुद्धाच्या-संबंधीं-विषयीं-पैकीं. | Buddha's of out of Buddha |
| सप्तमी | बुद्धे-स्मि-म्हि | बुद्धात-मध्यें-ठायीं-पैकीं-ठिकाणीं-वर. | in, on, upon at, Buddha |
| संबोधन | बुद्ध | हे बुद्धा ! | O Buddha |

**प्रयोग**—पालींत १ कर्तरिप्रयोग, २ कर्मणिप्रयोग, ३ भावेप्रयोग असे तीन प्रयोग आहेत कर्मणि व भावे या प्रयोगाची माहिती पुढें १२ व्या धड्यात आहे.

१. कर्तरिप्रयोग.—कर्तरिप्रयोगात प्रथमान्त कर्ता, द्वितीयान्त कर्म, आणि कर्त्याच्या पुरुष वचनाप्रमाणें क्रियापदाचें पुरुष-वचन असतें.

मराठींत कर्त्याच्या लिंग-वचन-पुरुषाप्रमाणें क्रियापदाचीं रूपें पालटतात. कर्त्याच्या लिंगाप्रमाणें क्रियापदात बदल होणें हें मराठींतच आहे त्याप्रमाणें संस्कृतात व पालींत होत नाहीत.

उदाहरण—बुद्ध जातो, यशोधरा जाते.

परंतु पालींत—बुद्धो गच्छति। यसोधरा गच्छति।

येथें बुद्ध व यशोधरा हे भिन्नलिंगी कर्ते असून 'गच्छति' हें क्रियापद कायमच राहतें. तेव्हा पालींत मराठीप्रमाणें क्रियापदाला लिंग नाहीं.

२. कर्तरिप्रयोगात निरनिराळे पुरुष दर्शविणारे असे अनेक कर्ते असले तर प्रथमपुरुषाचे बहुवचनी क्रियापद होतें. जसें–तू, मी आणि शिक्षक गावाला जाऊ–त्वं अहं आचरियो च गामं गच्छाम।

## अकारान्त पुल्लिंगी शब्दाचे प्रत्यय

| एकवचन | बहुवचन | |
|---|---|---|
| ओ | आ | प्रथमा |
| म् | ए | द्वितीया |
| एन | एहि, एभि | तृतीया |
| आय, स्स | न | चतुर्थी |
| आ, स्मा, म्हा | एहि, एभि | पचमी |
| स्स | न | षष्ठी |
| ए, स्मि, म्हि | एसु | सप्तमी |
| अ, आ | आ | संबोधन |

## १. अकारन्तो पुल्लिङ्गो बुद्ध सद्दो।

| एकवचन | बहुवचन | |
|---|---|---|
| बुद्धो | बुद्धा | पठमा |
| बुद्धं | बुद्धे | दुतिया |
| बुद्धेन | बुद्धेहि, बुद्धेभि | ततिया |
| बुद्धाय, बुद्धस्स | बुद्धान | चतुत्थी |
| बुद्धा, बुद्धस्मा, बुद्धम्हा | बुद्धेहि, बुद्धेभि | पञ्चमी |
| बुद्धस्स | बुद्धानं | छट्ठी |
| बुद्धे, बुद्धस्मिं, बुद्धम्हि | बुद्धेसु | सत्तमी |
| बुद्ध, बुद्धा | बुद्धा | आलपन |

¹ एवं किङ्कर, आवाट, पुत्त (पुत्र), रुक्ख (वृक्ष), पञ्ह (प्रश्न), धम्मराज (धर्मराज), महाराज, नर, अस्स (अश्व), आचरिय (आचार्य), इच्चादयो अकारन्ता पुल्लिङ्गा।

टीप:—वरील शब्दांत ज्या रूपांच्या खालीं रेघ आहे तीं रूपें संस्कृताच्या रूपांवरून आली आहेत. जसें:—बुद्धो (सं. बुद्धः), बुद्धा (सं. बुद्धाः), बुद्धेन (सं. बुद्धेन), बुद्धाय (सं. बुद्धाय), बुद्धेहि (सं. बुद्धैः), बुद्धस्स (सं. बुद्धस्य), बुद्धान (सं. बुद्धानाम्), बुद्धा (सं. बुद्धात्), बुद्धे (सं. बुद्धे), बुद्धेसु (सं. बुद्धेषु), बुद्ध (हे बुद्ध). बुद्धेभि हें रूप वैदिक रूपांवरून आलें. जसें:—अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिः। किंवा देवो देवेभिरागतम्।

### २. लिङ्गत्तये समो अम्ह (अस्मद्) सद्दो।

| | | |
|---|---|---|
| अहं | मयं, अम्हे | पठमा |
| मं, ममं | अम्हाकं, अम्हे, नो | दुतिया |
| मया, मे | अम्हेहि, अम्हेभि | ततिया |
| मम, मय्हं, अम्हं, ममं, मे | अम्हाकं, अस्माकं, नो | चतुत्थी |
| मया | अम्हेहि, अम्हेभि | पञ्चमी |
| मम, मय्हं, अम्हं, ममं, मे | अम्हाकं, अस्माकं, नो | छट्ठी |
| मयि | अम्हेसु | सत्तमी |

### ३. लिङ्गत्तये समो तुम्ह (युष्मद्) सद्दो।

| | | |
|---|---|---|
| त्वं, तुवं | तुम्हे | पठमा |
| त्वं, तुवं, तं, तवं | तुम्हे, वो | दुतिया |
| तया, त्वया, ते | तुम्हेहि, तुम्हेभि | ततिया |
| तव, तुय्हं, तुम्हं, ते | तुम्हाकं, वो | चतुत्थी |
| तया, त्वया, ते | तुम्हेहि, तुम्हेभि | पञ्चमी |
| तव, तुय्हं, तुम्हं, ते | तुम्हाकं, वो | छट्ठी |
| त्वयि, तयि | तुम्हेसु | सत्तमी |

नामें (पुल्लिंगी)

| | |
|---|---|
| बुद्ध–बुद्ध. | संघ–संघ. |
| आचरिय (आचार्य)–गुरु, शिक्षक. | धम्म (धर्म)–धर्म. |
| पुत्त (पुत्र)–मुलगा. | सरण (शरण)–वि० आश्रय देणारा-री-रें, शरण. |
| सुरिय (सूर्य)–सूर्य. | मनुस्स (मनुष्य)–माणूस. |
| गाम (ग्राम)–गाव. | भूप–राजा. |
| पञ्ह (प्रश्न)–प्रश्न. | पच्चामित्त (प्रत्यमित्र)–शत्रु. |

धातु प्रथमगण

| | |
|---|---|
| नम–नमस्कार करणें. | गम (गच्छ)–जाणें. |
| ओ+वद–उपदेश करणें. | पुच्छ (पुच्छ्, पृच्छ्)–६ ग० विचारणें. |
| दिस, पस्स, दिक्ख–पाहणें. | नी (नयति, नेति) नेणें. |

खालील वाक्यांचें मराठींत भाषांतर करा—

१. अहं बुद्ध नमामि । २. मयं (अम्हे) आचरिय नमाम । ३. त्वं पुत्त ओवदसि । ४. तुम्हे सुरिय पस्सथ । ५. सो गाम गच्छति । ६. सा आचरिय पञ्ह पुच्छति । ७. ते पुत्त संघ नयन्ति । ८. ता धम्म सरण गच्छन्ति । ९. मनुस्सो धम्म अनुसरति । १०. भूपा पच्चामित्त जयन्ति ।

शब्दार्थसंग्रह

चंद्र–चन्द, उळुराज, ससङ्क (शशाङ्क) पु०
सिंह–सीह (सिंह), मिगिन्द (मृगेन्द्र) पु०
वाघ–व्यग्घ (व्याघ्र) पु०
विद्यार्थी–माणवक, अन्तेवासिक. पु०
झाड–रुक्ख (वृक्ष), दुम (द्रुम), महीरुह, अग, कुज. पु०
चढणें–आ+रुह–आरुहति, ग०
हात–हत्थ (हस्त), कर. पु०
धुणें–धोव १ग० धुतात धोवन्ति.

शेतकरी—कस्सक (कृषक), खेत्ताजीव, पु०
बैल—गोण, उसभ (वृषभ), बलीवद्द (बलीवर्द), वुस, पु०
गाढव—गद्रभ (गर्दभ), खर, पु०
खालील वाक्यांचें पालींत भाषांतर करा.—

१. मी चंद्राला नमस्कार करतों.
२. आम्ही सूर्याला नमस्कार करतों.
३. तू सिंह पाहतोस.
४. तुम्ही वाघाना पाहता.
५. तो विद्यार्थ्याला प्रश्न विचारतो
६. ती गांवाला जाते.
७. ते झाडावर (रुक्ख) चढतात.
८. त्या हात धुतात.
९. शेतकरी शेतावर (खेत्त) बैल नेतो
१०. गाढव ओझीं नेतात.

---

## प्रश्नसंग्रह १

१. पालींत संस्कृतांतील कोणते स्वर व कोणतीं व्यंजनें नाहींत ?

२. पालींत काळ व अर्थ किती आहेत ?

३. सर्व गणांचीं विकरणें लिहा.

५. धातूला विकरण केव्हां लागतें ?

५. द्विकर्मक धातु म्हणजे काय तें सांगून त्याचीं दोन उदाहरणें द्या

६. मि, म, हे प्रत्यय धातूला लावण्यापूर्वी काय फरक होतो ?

७. वाक्यांत भिन्न पुरुषी कर्ते असल्यास क्रियापद कसें असावें तें लिहून एक उदाहरण द्या.

८. पालीभाषेचें व्याकरण व संस्कृतभाषेचें व्याकरण यांची पंधरा ते वीस ओळींत तुलना करा.

९. खालील वाक्यें शुद्ध करा.—

१ त्व बुद्ध नमति । २ मय आचरियं नमथ । ३ अह मुरिय पस्ससि । ४ तुम्हे गाम गच्छाम । ५ सो आचरिय नमामि ।

---

## दुतियो पाठो

पूर्वतयारी:—फल शब्द व दुसऱ्या गणातील धातूचा अर्थ पाठ करणें.

### द्वितीयगण

या गणातील धातूना 'अ' हें विकरण लागते व त्याचा लोप होतो.

ब्रू–२ ग० बोलणें.
सुप (स्वप्)–२ ग० निजणें.
उ + ठा, तिट्ठ (उद् + स्था + तिष्ठ्)–१ ग० उठणें.
आ + चर–१ ग० करणें, आचरणे.
धोव–१ ग० धुणें.
पा पिव–१ ग० पिणे.
सिना, न्हा (स्ना)–२ ग० स्नान करणें.
पठ (पठ्)–१ ग० शिकणें, पढणें.
हन (हन्)–२ ग० ठार करणें.
वद (वद्)–१ ग० बोलणे.
अस (अस्)–२ ग० होणें, असणें.
सी (शी)–२ ग० निजणें, झोपणें.
इ (इ)–२ ग० जाणें.
प + वा (प्र + वा)–२ ग० वाहणें (वारा वाहणें).
या (या)–२ ग० जाणें.
रुद (रुद्)–२ ग० रडणें.
जागर (जागृ)–२ ग० जागणें.

वर्तमानकाळ ब्रू–बोलणें

| ए. व | व. व. | | ए. व. | व. व. |
|---|---|---|---|---|
| ब्रवीमि | ब्रवीम | प्र. पु. | ब्रूमि | ब्रूम |
| ब्रवीषि | ब्रवीथ | द्वि. पु. | ब्रूसि | ब्रूथ |
| ब्रवीति | ब्रुवन्ति | तृ. पु. | ब्रूति | ब्रुवन्ति |

सुप (स्वप्)—झोपणें. सिना (स्ना)—स्नान करणें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सुपामि | सुपाम | प्र. पु. | सिनामि | सिनाम |
| सुपसि | सुपथ | द्वि. पु. | सिनासि | सिनाथ |
| सुपति | सुपन्ति | तृ. पु. | सिनाति | सिनान्ति |

हन (हन्)—ठार मारणें. अस (अस्)—होणें, असणें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| हनामि | हनाम | प्र. पु. | अस्मि, अम्हि | अस्म, अम्ह |
| हनसि | हनथ | द्वि. पु. | असि | अत्थ |
| हनति, हन्ति | हनन्ति | तृ. पु. | *अत्थि | सन्ति |

सी (शी)—झोपणें. इ—जाणें

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सेमि | सेम | प्र. पु. | एमि | एम |
| सेसि | सेथ | द्वि. पु. | एसि | एथ |
| सेति | सेन्ति | तृ. पु. | एति | एन्ति (यन्ति) |

वा—वाहणें. रुद—रडणें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वामि | वाम | प्र. पु. | रोदामि | रोदाम |
| वासि | वाथ | द्वि. पु. | रोदसि | रोदथ |
| वाति | वन्ति (वान्ति) | तृ. पु. | रोदति | रोदन्ति |

याप्रमाणें या—जाणें हा धातु चालवा.

अकारन्तो नपुंसकलिङ्गो फल सद्दो।

| | | |
|---|---|---|
| फल | फला, फलानि | पठमा |
| फल | फले, फलानि | दुतिया |
| फलेन | फलेहि, फलेभि | ततिया |
| फलाय, फलस्स | फलान | चतुत्थी |
| फला, फलस्मा, फलम्हा | फलेहि, फलेभि | पञ्चमी |

* पालींत स्वत्व चीमालकी दर्शक नामें बहुवचनी असलीं तरी क्रियापद मात्र एकवचनी आढळतें. जसें —पुत्तामऽत्थि धन मत्थि। माझे मुलगे आहेत, माझें द्रव्य आहे. धम्मपद गाथा ६२.

| | | |
|---|---|---|
| फलस्स | फलान | छट्टी |
| फले, फलस्मिं, फलम्हि | फलेसु | सत्तमी |
| फल | फला, फलानि | आलपन |

एव रूप, रज्ज (राज्य), उय्यान (उद्यान), जल, चित्त, पण्ण ( पर्ण ), पदुम, ( पद्म ), पाप, पुञ्ञ (पुण्य), पोत्थक ( पुस्तक ), पुप्फ, (पुष्प), सीस ( शीर्ष ) इच्चादयो अकारन्ता नपुसकलिङ्गा.

## शब्दार्थसंग्रह

सच्च ( सत्य )-न० खरें.
असच्च ( असत्य )-न० खोटें.
रत्ति ( रात्रि )-स्त्री० रात्र
दिवा-*अ० दिवसा.
निच्च ( नित्य )-न० नेहमीं.
पच्चूसकाल (प्रत्यूषकाल)-पु०पहाट.
पच्चूस ( प्रत्यूष )-पु० पहाट.
सरीरवलञ्जन-न० शौचमुखमार्जनादि शरीरशुद्धता
दुद्ध ( दुग्ध )-न० दूध
पाठ-पु० धडा.
पाण ( प्राण )-पु० प्राण, जीव
मुसावाद ( मृषावाद )-पु० खोटें बोलणे.
मज्ज ( मद्य )-न० दारू
मतक ( भृतक )-पु० सेवक.
केस्सचि (कस्यचित्)-अ० कोणाचाहि.
किस ( कृश )-वि० लुकडा
दुब्बण्ण ( दुर्वर्ण )-फिक्ट.
सन्तिक-सन्तिके अ० जवळ.
कुच्छिविकार ( कुक्षिविकार )-पु० पोटदुखी
आबाध-पु० रोग.
कुच्छिविकाराबाध-पु० पोटदुखीचा रोग.
समण ( श्रमण )-पु० बुद्धभिक्षु.
सक ( स्वक )-पु० स्वत चे
मुत्त ( मूत्र )-न० मूत, लघवी
करीस ( करीष )-न० विष्ठा.
महाराज-पु० महाराज
ञातक ( ज्ञातक )-पु० नातेवाईक.
अज्ज ( अद्य )-अ० आज.

---

* ज्याला लिंग, वचन, विभक्ति लागत नाहीं त्यास अव्यय असें म्हणतात.

१ 'किं' सर्वनामाच्या कोणत्याहि रूपाला 'चि' ( चित् ), चन, अपि, हीं अव्ययें जोडलीं असता 'कोणी एक', 'काही एक', 'सुद्धा' अशा अर्थी अव्ययें होतात कोचि, काचि, कोऽपि, काऽपि

उय्यान ( उद्यान )—न० बाग.
किं—अ० काय.
भन्ते—अ० महाराज.
कोचि—अ० काही.
उपद्दव (उपद्रव)—पु० त्रास, पीडा.
एत्थ अ०—येथें.
पुप्फगन्ध ( पुष्पगन्ध)—पु० फुलाचा वास.
पटिवात ( प्रतिवात)—पु० वाऱ्याची उलट बाजू; उलटा वारा.
तगर—पु० तगरीचें झाड.
मल्लिका—स्त्री० जाई, जुई, मोगरी.
सत—सज्जनाचा, सन्त शब्द षष्ठी ए.व.
दिसा (दिशा)—स्त्री० दिशा.
सप्पुरिस ( सत्पुरुष )—पु० सज्जन.

खालील वाक्यांचें मराठींत भाषांतर करा —

१. अहं सच्चं ब्रवीमि ( ब्रूमि )। २. मयं ( अम्हे ) असच्चं न ब्रवीम ( ब्रूम ). ३. अम्हे रत्तिं न जागराम, दिवा *च न सुपाम। ४. माणवका निच्चं पच्चूसकाले उत्तिट्ठन्ति ( उट्ठन्ति ), सरीरवळञ्जनं आचरन्ति, मुखं च धोवन्ति, दुद्धं च पिवन्ति, सिनति (सिनन्ति), पाठे च पठन्ति। ५. अम्हे पाणं न हनाम, मुसावादं न वदाम, मज्जं न पिवाम। ६. नाहं भतकोऽस्मि कस्सचि। ७. किसो त्वं असि दुब्बण्णो सन्तिके मरणं तव। ( नेरंजरा नदीच्या काठीं तपश्चर्येमुळें खंगलेल्या बुद्धाला उद्देशून मदन म्हणतो—प्रधानसुत्त सुत्तनिपात ). ८. कुच्छिविकाराबाधो समणो मक्के भुसे करीसे च सेति। ९ †अत्थि पन ते महाराज ञातका? । १०. अहं अज्ज तव ( तुम्ह ) उय्यानं गमि। ११. किं भन्ते, अत्थि कोचि उपद्दवो एत्थ तुम्हाकं, नत्थि अम्हाकं कोचि उपद्दवो।

गाथा

न पुप्फगन्धो पटिवातमेति न चदनं तगरमल्लिका वा।
सतं च गन्धो पटिवातमेति सब्बा दिसा सप्पुरिसो पवाति ॥ ७ ॥
( धम्मपद, पुप्फवग्ग, गाथा ५४ )

---

* च किंवा वा हीं अव्ययें ज्या नामांचा संयोग होतो त्यांतून प्रत्येकाच्या पुढें किंवा एकदाच म्हणजे सर्व शब्दांच्या शेवटीं लावतात

† प्रश्नार्थक वाक्य विचारावयाचें असता वाक्याच्या आरंभीं किं, अपि, किंवा क्रियापद घालतात.

## ततियो पाठो

### पूर्वतयारीः—अग्गि, भिक्खु शब्द पाठ करणें.

### तृतीयगण

१. या गणातील धातूंना ' अ ' हें विकरण लागून त्याचा लोप होतो; *आणि प्रत्यय लागताना धातूचें द्वित्व होतें.*

२. द्वित्वाचे नियमः—द्वित्व म्हणजे दोनदा उच्चार. जसें:—दा-दा, हा-हा, हु-हु. धातूचें द्वित्व केलें असता त्याच्या पहिल्या भागाला अभ्यास म्हणतात.

उदाहरण:—दादा येथें पहिला दा हा अभ्यास होय; हाहा, हुहु, इत्यादि अभ्यास होय.

३. अभ्यासातल्या क वर्गातील व्यजनाबद्दल क्रमानें च वर्गातील व्यजन होतें. ह बद्दल झ वर्ण होतो.

उदाहरण:—हाहा येथें अभ्यासातील हा बद्दल झा वर्ण झाला म्हणून झाहा असें झालें.

४. अभ्यासातील व्यजन, पाच वर्गांपैकी कोणत्याहि वर्गातील दुसरें व्यजन असेल तर त्या व्यजनाबद्दल त्याच वर्गातील पहिलें व्यजन होतें, चवथें असेल तर तिसरें होतें.

उदाहरण:—झाहा येथें अभ्यासातील व्यजन 'झा' आहे आणि तें च वर्गातील चवथें व्यजन असल्यामुळें त्याच्या जागीं 'ज' हें तिसरें व्यजन झालें. म्हणून जाहा असें झालें.

५. दा-देणें, हा-टाकणें, याच्या अभ्यासाच्या वर्णातील ' आ ' चा अ होतो, जसें-दादा-ददा, जाहा-जहा,

### आज्ञार्थ The Imperative

| परस्मैपद | | प्रत्यय | आत्मनेपद | |
|---|---|---|---|---|
| ए. व. | ब. व. | | ए. व. | ब. व. |
| मि | म | प्र. पु. | ए | आमसे |
| हि | थ | द्वि. पु. | स्सु | व्हो |
| तु | अन्तु | तृ. पु. | त | अन्त |

( फळ्यावर लिहून समजावून देणें )

| धातु | विकरण | आज्ञार्थ प्र. पु. ए. व. प्रत्यय |
|---|---|---|
| दा | अ | मि |

| | | |
|---|---|---|
| ददा+मि=ददामि | ददा+म=ददाम | प्र. पु. |
| ददा+हि=ददाहि | ददा+थ=ददाथ | द्वि. पु. |
| ददा+तु=ददातु | ददा+अन्तु=ददन्तु | तृ. पु. |

( १ ) आज्ञार्थाचा द्वितीय पुरुषाचा 'हि' प्रत्यय विकल्पाने लागतो. जेव्हा 'हि' प्रत्यय लागतो तेव्हा मागील ऱ्हस्व स्वर दीर्घ होतो. पस्स+हि=पस्साहि, नम+हि=नमाहि. 'हि' प्रत्यय न लागलेलीं रूपें पस्स, नम.

*( २ ) प्रत्ययाच्या आरंभीं स्वर आल्यास धातूतील शेवटच्या स्वराचा* लोप होतो. ददा–दद्+अन्तु=ददन्तु.

आत्मनेपद

| ए. व. | ब. व. | |
|---|---|---|
| ददे | ददामसे | प्र. पु. |
| ददस्सु | ददव्हो | द्वि. पु. |
| ददत | ददन्त | तृ. पु. |

आत्मनेपदी आज्ञार्थाचें उदाहरणः—त्व पि समण कसस्सु च वपस्सु च कसित्वा वपित्वा च भुञ्जस्सु । ( कसिभारद्वाजसुत्त, सुत्तनिपात. )

| हा—टाकणें. | | | हु—यज्ञ करणें. | |
|---|---|---|---|---|
| ए. व. | ब. व. | | ए. व. | ब. व. |
| जहामि | जहाम | प्र. पु. | जुहोमि | जुहोम |
| जह, जहाहि | जहाथ | द्वि. पु | जुहो, जुहोहि | जुहोथ |
| जहातु | जहन्तु | तृ. पु. | जुहोतु | जुहोन्तु. |

आज्ञार्थाचा उपयोग.

( १ ) आज्ञा ( order )–त्व गाम गच्छाहि । तुम्हे सद्दं पठथ ।

( २ ) अनुज्ञा ( Permission )–किंकरो भारं नयतु ।

( ३ ) इच्छा ( Wish )—मनुस्सा बहुजनहिताय चरन्तु।
( ४ ) विनति ( Request )—तुम्हे आसने उपविसथ।
( ५ ) प्रार्थना ( Prayer )—अधिवासेतु भगवा भत्त। भगवानानें भोजनाला समती द्यावी
( ६ ) आशीर्वाद ( Blessing )—त्वं चिरं जीव।
( ७ ) उपदेश ( Advice )—तुम्हे आचरियानं मातापितुन्नं च वचनं पालयथ।
( ८ ) सूचना दर्शविणें ( Proposal )—सम्म उय्यानं पविसाम।

टीप — भूतकाळाच्या पूर्वी ' मा ' हें अव्यय लाविलें असता आज्ञार्थाचा अर्थ होतो उदाहरण— त्वं मा गच्छि। तू जाऊ नकोस.

१ पुल्लिंगी इकारान्त व उकारान्त शब्दाचे प्रत्यय

| | | |
|---|---|---|
| — | ओ | प्रथमा, संबोधन |
| म् | ओ | द्वितीया |
| ना | हि, भि | तृतीया |
| स्स, नो | न | चतुर्थी |
| ना, स्मा, म्हा | हि, भि | पंचमी |
| स्स, नो | न | षष्ठी |
| स्मिं, म्हि | सु | सप्तमी |

२ इकारन्तो पुल्लिङ्गो अग्गि सद्दो।

| | | |
|---|---|---|
| अग्गि | अग्गी, अग्गयो | पठमा |
| अग्गिं | अग्गी, अग्गयो | दुतिया |
| अग्गिना | अग्गीहि, अग्गीभि | ततिया |
| अग्गिस्स, अग्गिनो | अग्गीनं | चतुत्थी |
| अग्गिना, अग्गिस्मा, अग्गिम्हा | अग्गीहि, अग्गीभि | पंचमी |
| अग्गिस्स, अग्गिनो | अग्गीनं | छट्ठी |

| | | |
|---|---|---|
| अग्गिस्मिं, अग्गिम्हि | अग्गिसु, अग्गीसु | सत्तमी |
| अग्गि | अग्गी, अग्गयो | आलपनं |

एव रासि ( राशि ), कवि, इसि ( ऋषि ), इच्चादयो इकारन्ता पुल्लिङ्गा।

३. उकारन्तो पुल्लिङ्गो भिक्खु ( भिक्षु ) सद्दो।

| | | |
|---|---|---|
| भिक्खु | भिक्खू, भिक्खवो | पठमा |
| भिक्खु | भिक्खू, भिक्खवो | दुतिया |
| भिक्खुना | भिक्खूहि, भिक्खूभि | ततिया |
| भिक्खुस्स, भिक्खुनो | भिक्खून | चतुत्थी |
| भिक्खुना, भिक्खुस्मा, भिक्खुम्हा | भिक्खूहि, भिक्खूहि | पंचमी |
| भिक्खुस्स, भिक्खुनो | भिक्खून | छठी |
| भिक्खुस्मिं, भिक्खुम्हि | भिक्खुसु, भिक्खूसु | सत्तमी |
| भिक्खु | भिक्खू, भिक्खवो, भिक्खवे | आलपन |

एव उच्छु ( इक्षु ), सत्तु ( शत्रु ), सेतु, बन्धु, पसु ( पशु ), मच्चु ( मृत्यु ), परसु ( परशु ), इच्चादयो उकारन्ता पुल्लिङ्गा।

## तृतीयेचा उपयोग

तृतीया—ही विभक्ति १ कर्ता, २ करण ( साधन ), ३ हेतु ( कारण, उद्देश ), ४ विशिष्टस्थितिदर्शकचिन्ह, ५ कालावधि, हे अर्थ दाखविते.

( १ ) कर्मणि व भावे प्रयोगात कर्त्याला तृतीया लागते.

( २ ) करणः—चक्केहि रथो गच्छति। चाकांनी रथ जातो.

( ३ ) हेतुः—सो अज्झयनेन वसति। तो अध्ययनासाठीं राहतो. तव कम्मुना सन्तुट्ठोऽम्हि। तुझ्या कामामुळें मी संतुष्ट झालों.

( ४ ) विशिष्टस्थितिदर्शक चिन्हः—कासाववत्थेन मुण्डेन च एसो बुद्धभिक्खु अत्थि। पिवळ्या वस्त्रावरून व मुंडणावरून हा बुद्ध भिक्षु आहे.

( ५ ) कालावधिः—एखाद्या क्रियेची सिद्धि अमुक काळांत झाली हें दाखवावयाचें असल्यास कालावधिदर्शक नामाची तृतीया होते. ब्राह्मणो एकेन संवच्छरेन गाथ पगुणं कत्वा बोधिसत्तं आह। ब्राह्मणानें एक वर्षभर गाथा पाठ केली व बोधिसत्त्वाला म्हणाला.

(६) सह, सद्धिं (बरोबर), सम-सारखा, सदिस (सदृश) सारखा या अर्थाच्या शब्दाना तृतीया लागते. १२, १३ वाक्यात यांचा उपयोग आहे.

(७) किं, अत्थ, गुण याच्यांशीं संबंध असणाऱ्या नामाला तृतीया लागते. न मय्हं दानेन गुणेन च अत्थो । किं राजपुत्त भच्चेहि ।

(८) न्यूनत्वः—व्यक्तीचा शरीराच्या अवयवातील कमीपणा दाखवावयाचा असल्यास त्या अवयववाचक शब्दाची तृतीया योजतात. जसेः—अक्खिना काणो ।

## शब्दार्थसंग्रह

नेत्त-(नेत्र) न० डोळा.
नत्थु- स्त्री० नासा. स्त्री० नाक.
घा (घ्रा)-१, १० गण, हुंगणें, वास घेणें. घायति.
रथ-पु० रथ.
कासाव (काषाय)-वि०पिवळें वस्त्र.
विरिय (वीर्य)-न० प्रयत्न.
जीवित-न० प्राण.
देव-पु० महाराज.
रज्ज (राज्य)-न० राज्य.
सुभ(शुभ्)-१ग० शोभणें. सोभति.
तत्थ (तत्र)-अ० तेथें.
न-अ० नाहीं.
समण(श्रमण)-पु०बुद्धभिक्षु,सन्यासी.
पदुम (पद्म)-न० कमळ.
गन्ध-पु० वास.
चक्क (चक्र)-न० चाक.
भिक्खु (भिक्षु)-पु० भिक्षु.
चीवर-न० वस्त्र.
पच्चामित्त (प्रत्यमित्र)-पु० शत्रु.
मे-मला, माझा.
पुत्त (पुत्र)-पु० मुलगा.
पिलन्धन-न० अलंकार, दागिना.
हत्थ (हस्त)-पु० हात.
व्हे-१ ग० आ+व्हे (ह्वा)-अव्हयति, अव्हेति बोलावणें.
मुण्डक-पु० मुंडण केलेला, हजामत केलेला.
तात-पु० बाबा, बाळा.
दुल्लभमनुस्सत्त (दुर्लभमनुष्यत्वम्) मिळण्यास कठीण असा मनुष्य जन्म.
दान-न० दान
सील (शील)-न० शील, वर्तन.

उपोसथकम्म—बुद्ध धर्मानुयायी लोक अष्टमी, चतुर्दशी (शुद्ध व वद्य), पौर्णिमा, अमावास्या या दिवशीं व्रतस्थ राहून विहारांत जमून धार्मिक चर्चेत काल घालवितात.

कर–करोहि, कर धातु आज्ञार्थ द्वि. पु. ए. व.
विहार–पु० मठ.
उदेन–पु० एका राजाचें नाव.
सम–वि० सारखा.
हत्थिवाहनसपन्न–वि० ज्याच्याजवळ पुष्कळ हत्ती आहेत असा.
अञ्ञ–( अन्य ) वि० दुसरा-री-रें.
चारिका–स्त्री० फिरती.
बहुजनहित–न० बहुजनाचें कल्याण.
लोकानुकम्पा–स्त्री० लोकावर दया करणें.
अत्थ–पु० फायदा.

खालील वाक्यांचें मराठींत भाषांतर कराः—

१. अह नेत्तेहि पदुम पस्सामि। २. अम्हे, नासाय (नत्थुना) गन्ध घायाम। ३. चक्केभि रथो गच्छति। ४. तुम्हे भिक्खून कासावानि चीवरानि ददाथ। ५. सो विरियेन पच्चामित्त जयतु। ६. जीवित मे देहि। ७. देव, पुत्तस्स मे रज्ज देथ। ८. सा पिलन्धनेहि सोभति। ९. ते म हत्थेभि तत्थ अव्हेन्ति। १०. न मुण्डकेन समणो होति। ११. तात, तया (त्वया) दुल्लभमनुस्सत्त लद्ध, दान देहि, सील रक्ख, उपोसथकम्म कर। १२. माणवका आचरियेहि सद्धिं (सह) विहार गच्छन्तु। १३. उदेनेन समो हत्थिवाहनसपन्नो अञ्ञो भूपो नत्थि। १४. चरथ भिक्खवे चारिक बहुजनहिताय, बहुजनसुखाय, लोकानुकम्पाय, अत्थाय, हिताय, सुखाय, देवमनुस्सान।

नहि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचन।
अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनतनो ॥ २ ॥

( धम्मपद, यमकवग्ग, गाथा ५ )

टीपः—वाक्यात 'दा' धातूचा उपयोग करताना ज्याला द्यावयाचें त्याची चतुर्थी होते. वरील ४, ६, ७ हीं वाक्यें या नियमाचीं उदाहरणें होत.

## शब्दार्थसंग्रह

पर्वत–पब्बत, सेल (शैल), नग, अचल, अद्दि (अद्रि), सिलुच्चय (शिलोच्चय). पु०
वारा–वात, मालुत (मारुत), पवन, वायु, अनिल, समीर, गन्धवाह. पु०
हलणें–सम्+ईर, १ ग० समीरति.
नाहीं–न. अ०
लोक–जन, लोक. पु०
सुख–सात, सुख. न०
जगणें–जीव, १ ग० जीवति.
शेतकरी–कस्सक (कर्षक), खेत्ताजीव. पु०
नांगर–नङ्गल (लाङ्गल), हल (हल). पु०
शेत–खेत्त (क्षेत्र), केदार. न०
नांगरणें–कस (कृष्). १ग० कसति.
धान्य–धञ्ञ. न०
व–च. अ०
पेरणें–वप. ग० १ वपति.
लोकवृत (लोक्यात राहणारे)–जानपद. पु०
हात–हत्थ (हस्त), कर, पाणि. पु०
कापूस–कप्पास (कार्पास). पु०
विंजणें–कन्त. १ ग० कन्तति.
आणि–च. अ०
सूत–सुत्त (सूत्र). न०
सूत काढणें–कन्त १ ग० सूत काढीत–तन्तुवायं कन्तु.
तुम्ही–तुम्हे. तुम्ह शब्द प्र. व. व.
ऊस–उच्छु (इक्षु). पु०
आणणें–आ + नि = नय १ ग० आनयति, आनेति.
ऋषि–इसि. पु०
पाय–पाद, चरण. पु०
विहार–विहार. पु०
जाणें–गम गच्छ. १ ग० गच्छति.
गडी–किंकर. पु०
कुऱ्हाड–फरसु (परशु). पु०
लाकूड–कट्ठ (काष्ठ). न०
तोडणें–छिद. ७ ग० छिन्दति.
तळें–तळाक (तडाग). पु०
कमळ–पदुम (पद्म), उप्पल (उत्पल). न०
शोभणें–सुभ (शुभ्). १ग० सोभति
वाघ–ब्यग्घ (व्याघ्र). पु०
मास–मस (मास). न०
राहणें, वाचणें, जगणें–जीव. १ ग० जीवति.
नोकर–किंकर, दास. पु०
मालक–सामी (स्वामिन्). पु०
बरोबर–सद्द, सद्धिं. अ०
गाव–ग्राम (ग्राम). पु०
कवि–कवि. पु०

प्रशंसा करणें–पसंस (प्र+शस्). १ ग० पसंसति.
अग्नि–अग्गि. पु०
घर–घर, गेह, न०
जळणें–दह्. १ ग० दहति.
आचारी–भत्तकारक (भक्तकारक).
सूपकार, सूद, ओदनिक, रसक. पु०
सर्पण–इन्धन. न०
भात–भत्त (भक्त), ओदन. पु०
आमटी–सूप. पु०
शिजविणें–पच. १ ग० पचति.
झाड–रुक्ख (वृक्ष). पु०
फूल–पुप्फ (पुष्प), कुसुम. न०
फळ–फल. न०
माणूस–मनुस्स (मनुष्य०), मानुस, मानव. पु०
आरोग्य–आरोग्य न०
जगणें–जीव १ ग० जगतात–जीवन्ति.

पालींत भाषांतर कराः—

१ पर्वत वाऱ्यानें हलत नाहीं. २ लोक सुखानें जगोत. ३ शेतकरी नांगरानें शेत नांगरतो व धान्य पेरतो. ४ खेडूत हातानें कापूस पिंजोत आणि सूत काढोत. ५ तुम्ही ऊस आणा आणि आम्हाला द्या. ६ ऋषी पायांनीं विहाराकडे (विहार) जावोत. ७ गडी कुऱ्हाडीनें लाकडें तोडोत. ८ तळीं कमळांनीं शोभतात ९ वाघ मासावर (नें) (मसेन), राहतात (जगतात). १० नोकर मालकाबरोबर गावाला जावोत. ११ कवी बुद्धाची (बुद्ध) प्रशंसा करतात. १२ अग्नीमुळें घर जळतें. १३ आचारी सर्पणामुळें भात व आमटी शिजवितो. १४ झाडें फुलांनीं व फळांनीं शोभतात. १५ माणसें आरोग्यामुळें जगतात.

---

## प्रश्नसंग्रह ३

१ तिसऱ्या गणाचें विकरण सांगून द्वित्व म्हणजे काय तें सोदाहरण सांगा.

२ आज्ञार्थाचे आत्मनेपदी प्रत्यय लिहा.

३ आज्ञार्थाचे उपयोग सांगून त्यांच्यापैकीं कोणत्याहि चारांचीं उदाहरणें द्या.

४ भूतकाळाचा आज्ञार्थी केव्हा उपयोग करतात.

५ तृतीयेचे उपयोग सांगून त्यांच्यापैकीं कोणत्याहि चारांचीं उदाहरणें द्या.

६ वाक्यात 'दा' धातूचा उपयोग करावयाचा असल्यास कोणती विभक्ति योजतात तें सांगा व एक उदाहरण द्या.

७ माहिती लिहा.––उपोसथ.

८ खालील वाक्यांचें संस्कृतांत रूपांतर कराः––

१ मनुस्सा सीलेन सोभन्ते। २ किंकरो फरसुना कट्ठानि छिन्दति।

## चतुत्थो पाठो

पूर्वतयारी ––पजा, भूमि शब्द पाठ करणें.

### चतुर्थ गण

कुध (क्रुध)–कुप–रागावणें, कुज्झति, कुप्पति.

मुह–मोह पाडणें, मूर्छित होणें, वेडें होणें, मुय्हति.

जन (जा)–उत्पन्न होणें, जायति. विद (विद्) असणें; विज्जति.

उप+नह–मनांत ठेवणें, खूण गाठ बांधणें. उपनय्हति.

सम (शम् शाम्)–शांत होणें, थंड होणें. सम्मति.

सम (श्रम् श्राम्)–थकणें, दमणें. सम्मति.

नत (नृत्)–नाचणें, नच्चति.

नस् (नश्)–नाश होणें, नस्सति.

तुस (तुष्)–संतुष्ट होणें, खूष होणें, तृप्त होणें. तुस्सति.

सुस (शुष्)–वाळणें, सुकणें. सुस्सति.

युध (युध्)–लढणें. युज्झति.

लुभ (लुभ्)–लोभ धरणें. लुब्भति.

मद (मद् माद्)–चूक करणें. मज्जति.

सिव–वस्त्र शिवणें. सिब्बति.

दिव–जुगार खेळणें. दिब्बति.

बुध–जाणणें. बुज्झति.

१ या गणांतील धातूंना 'य' हें विकरण लागतें. धातूला विकरण जोडण्यापूर्वी धातूच्या शेवटच्या स्वराचा लोप होतो.

कुध्+य=कुध्य (भाषेचा नियम ३५ प्रमाणें ध्य चा ज्झ होतो). कुज्झ+ति=कुज्झति.

तद्वत् युध्+य=युध्य=युज्झ+ति=युज्झति.

विशिष्टरूप जन+जाय=जायति. विद्+य=विद्य (भाषेचा नियम ५९प्रमाणें 'द्य'चा 'ज्ज' होतो). विज्ज + ति = विज्जति. मद् + य = मज्ज + ति = मज्जति. उप + नह् + य = (भाषानियम ५५ प्रमाणें नह्य असें न होता 'नय्ह' असा वर्णविपर्यय होतो.) उपनय्ह + ति = उपनय्हति. सम् + य = सम्य (भाषानियम ८० प्रमाणें 'य' चा लोप होतो). सम्म + ति = सम्मति. सुस सुस्सति. तुस तुस्सति. नस नस्सति. लुभ + य = लुभ्य + ति = लुभ्यति (भाषानियम ८० व ५१ आ प्रमाणें) लुब्भति.

भूतकाळ ( Past tense ) प्रत्यय

| परस्मैपद | | | आत्मनेपद | |
|---|---|---|---|---|
| ए. व. | ब. व | | ए. व. | ब. व. |
| इ | इम्ह | प्र. पु. | इ | म्हसे |
| इ | इत्थ | द्वि. पु. | इ | व्हे |
| इ | इसु, उ | तृ. पु. | इत्थ | उ |

२ कोणत्याहि धातूला भूतकाळाचे प्रत्यय लावण्यापूर्वी धातूच्या मागें 'अ' विकल्पानें लागतो. एकदां धातूमागें 'अ' जोडून किंवा 'अ' न जोडता भूतकाळाचीं रूपें देण्यापेक्षा 'अ' आणि धातु याच्यामध्यें—अशी आडवी रेघ 'अ'ची विकल्पदर्शक खूण लिहितात. जसें—अ – कुज्झि, अ – युज्झि.

३ स्वरादि प्रत्यय धातूला जोडण्यापूर्वी धातूच्या अंत्य स्वराचा लोप होतो.

कुध, कुज्झ-अकुज्झ् + इ = अकुज्झि किंवा कुज्झि. अकुज्झ् + इम्ह = अकुज्झिम्ह किंवा कुज्झिम्ह. अकुज्झ् + इ = अकुज्झि किंवा कुज्झि.

अकुज्झ् + इत्थ = अकुज्झित्थ किंवा कुज्झित्थ.

अकुज्झ् + इ = अकुज्झि किंवा कुज्झि.

अकुज्झ् + इसु = अकुज्झिसु किंवा कुज्झिसु.

अकुज्झ् + उ = अकुज्झु किंवा कुज्झु.

( सूचना:—खालील मजकूर फळ्यावर लिहून समजून देणें. )

| धातु | विकरण | भूतकाळ परस्मै. प्र. पु. एकवचनी प्रत्यय |
|---|---|---|
| विद | य | इ |

